# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

### राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षकांची नवीन पेन्शन योजनेची खाती उघडण्याबाबत

**(१) १७११ (२१-०१-२०१५). श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेत दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी सेवेत आलेल्या व दिनांक १ नोव्हेंबर, २००५ नंतर संबंधी शाळा किंवा वर्ग तुकडी १०० टक्के अनुदानावर आली असेल अशा शाळा व वर्गतुकड्यांवर कार्यरत शिक्षकांना लागू केलेली जुनी पेन्शन योजना व त्यासाठी उघडण्यात आलेली भविष्य निर्वाह निधी खाते बंद करुन नवीन सेवानिवृत्त योजनेची खाती उघडावीत या शासन आदेशाविरोधात राज्यातील हजारो शिक्षकांनी मा.उच्च न्यायालयात जावून स्थगित आदेश घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अपघाताने मृत्यू किंवा अन्य प्रकारे मृत्यूमुखी पडणाऱ्या शिक्षक शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना खाते न उघडल्यामुळे अंशदायी पेन्शन योजनेचा लाभ मिळण्यास व्यत्यय निर्माण झाला असून कायदेशीर अडचणी निर्माण झाल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच ६ व्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम सुध्दा अंशदायी पेन्शन योजनेच्या खात्यात जमा झालेली नाही, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१०-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) होय, हे खरे आहे.
(४) दिनांक १ नोव्हेंबर, २००५ नंतर नियुक्त संबंधी शाळा किंवा वर्ग तुकडी १०० टक्के अनुदानावर आली असेल अशा शाळा व वर्ग तुकड्यांवर कार्यरत शिक्षकांना लागू केलेली जुनी पेन्शन योजना लागू करण्याबाबतची बाब न्यायप्रविष्ट आहे, तसेच ६ व्या वेतन आयोगाच्या थकबाकीची रक्कम अंशदायी निवृत्तीवेतन योजनेच्या खात्यात जमा करण्याचे आदेश काढण्याबाबत कार्यवाही चालू आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात पहिली ते दहावी पर्यंत तुकड्या वाढीसाठी आणि शाळा प्रवेशासाठी नविन निकष लावण्याबाबत

**(२) १०८९८ (०४-०८-२०१५). श्री.ख्वाजा बेग, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात पहिली ते दहावी पर्यंत तुकड्या वाढीसाठी आणि शाळा प्रवेशासाठी नविन निकष लावण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निर्णयाचे स्वरुप काय आहे,
(३) तसेच सदर कायदयाची अंमलबजावणी केव्हापासून अंमलात आणण्यात येणार आहे ?

**श्री.विनोद तावडे (३०-१०-२०१८) :** (१) व (२) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ मधील तरतूदीनुसार तुकडी वाढ होत नसून प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक अशी शाळांची संरचना झाली आहे व विद्यार्थी पटसंख्येआधारे शिक्षक पटसंख्या निश्चित करण्यात येते तसेच शाळा प्रवेशाचे वय निश्चित करण्यात आले आहे.

(३) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ हा दिनांक १ एप्रिल, २०१० पासून लागू झाला आहे.

---

## सिंधुदुर्ग जिल्ह्यातील प्राथमिक शाळांच्या इमारती धोकादायक असल्याबाबत

**(३) १९७०८ (२३-०८-२०१६). श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सिंधुदुर्ग जिल्ह्यातील १६९ प्राथमिक शाळांच्या इमारती धोकादायक असल्याची माहिती प्राथमिक शिक्षणाधिकाऱ्यांनी शासनाला तसेच जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांना माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान आपल्या अहवालाद्वारे कळविले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

शिक्षणाधिकाऱ्यांनी सिंधुदुर्ग जिल्ह्यातील १५५ शाळांच्या बांधकाम/दुरुस्तीचा प्रस्ताव सन २०१६-१७ मध्ये जिल्हा परिषदेमार्फत जिल्हा नियोजन समितीला सादर केला होता.

(२) संदर्भीय कामांसाठी रुपये ४९२ लक्ष निधी उपलब्ध करण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# राज्यातील अनुदानित शाळांमधील पदवीधर ग्रंथपालांना प्रशिक्षित पदवीधरांची वेतनश्रेणी लागू करण्याबाबत

**(४) २०२७९ (२३-०८-२०१६). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर : तारांकित प्रश्न क्रमांक १४९६६ ला दिनांक २९ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनुदानित माध्यमिक शाळांमधील पदवीधर ग्रंथपालांना प्रशिक्षित पदवीधरांची वेतनश्रेणी देण्याबाबतचा विषय अर्थसंकल्पीय अधिवेशनात सभागृहात चर्चेला आला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेला निर्णय लागू करणे क्रमप्राप्त आहे असे आश्वासन दिनांक २९ मार्च, २०१६ रोजी सभागृहात देण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मा.न्यायालयीन निर्णयाच्या अनुषंगाने सदस्यासोबत बसून चर्चा करण्यात येईल असेही आश्वासन देण्यात आले होते ते केव्हा पूर्ण करण्यात आले आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२), (३) व (४) शासन निर्णयानुसार भोळे आयोग, चौथ्या, पाचव्या आणि सहाव्या वेतन आयोगाने विविध संवर्गाना शिफारस केलेल्या वेतनश्रेणी अनुज्ञेय ठरविण्यात आलेल्या आहेत. यामध्ये ग्रंथशास्त्रातील पदवीप्राप्त असणाऱ्या पदवीधर अर्हताधारक उमेदवारांना द्यावयाच्या वेतनश्रेणी संदर्भात मतभिन्नता होत असल्याने सदर प्रकरणी मा.उच्च न्यायालयात दाखल विविध रिट याचिका तसेच सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुमती याचिकेमधील निर्णयाच्या अनुषंगाने शासन परिपत्रक दिनांक १४ जून, २०१६ अन्वये पदवीधर व ग्रंथशास्त्रातील पदवीधारक उमेदवारांची अर्हता व वेतनश्रेणी निश्चित करण्यात आलेली आहे.

---

## अलिबाग येथील पेण अर्बन बँकेत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(५) २०५०० (१९-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, श्री.सुभाष झांबड, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ८३२६ ला दिनांक १३ जुलै, २०१५ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अलिबाग येथील पेण अर्बन बँक गैरव्यवहार प्रकरणी करावयाची कारवाई व कर्ज वसुली याचा आढावा घेण्यासाठी उच्च न्यायालयाने जिल्हाधिकाऱ्यांच्या नेतृत्वाखाली विशेष कृती समिती स्थापना केली असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या गैरव्यवहारातील रक्कम रुपये ५९८ कोटी ७२ लाख वसुल करुन बँकेच्या पुनरुज्जीवनाच्या दृष्टीने प्रयत्न करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (३१-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) बँकेच्या वसुलीचे सनियंत्रण व अनुषंगिक कामकाज करण्यासाठी दिनांक १६/१२/२०१५ च्या आदेशान्वये जिल्हाधिकारी, रायगड यांच्या अध्यक्षतेखाली विशेष कृती समिती स्थापन करण्यात आली आहे. त्यानुसार समितीचे कामकाज सुरु आहे.

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडील याचिका क्र. ३६४४/२०११ मधील दिनांक १७/१०/२०१५ च्या आदेशानुसार बँकेच्या चौकशी कामकाजावर देखरेख ठेवण्यासाठी दिनांक ०९/०२/२०१६ च्या शासन निर्णयान्वये श्री.जे. ए. पाटील, सेवानिवृत्त न्यायाधिश यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली असून सदर समितीने दिनांक ०८/०८/२०१६ रोजी मा.उच्च न्यायालयास अहवाल सादर केला आहे.

मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडील क्रिमीनल रिट पिटीशन क्रमांक ३१४४/२०१२ मधील दिनांक २०/१२/२०१३ च्या आदेशानुसार महाराष्ट्र ठेवीदार

हितसंरक्षण अधिनियम १९९९ (एम.पी.आय.डी.) चे तरतुदीनुसार पेण अर्बन बँक लि. पेण या बँकेच्या मालमत्ता जप्त करुन विक्री प्रक्रिया पार पाडण्यात येत आहे.

(३) कार्यवाही सुरु आहे.

---

## भोर (जि.पुणे) तालुक्यातील भूमापन अधिकारी तहसिल मंडळाधिकारी, तलाठी यांनी संगनमत करुन शेतकऱ्यांची फसवणूक केल्याबाबत

**(६) २७३६७ (१३-०४-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भोर (जि.पुणे) तालुक्यातील भाटघर धरण जलाशय भागातील बारे खुर्द येथील शेतजमीन सर्व्हे नं. २० चा जुना फाळणी बारा लागू करुन ज्या फाळणी बाराच्या आधारे सर्व्हे नं. ३६, ३७, ३८ व ३९ ला फेरफार क्र. १०७ नुसार एक जमीन दलाल व भोर तहसिलदार कार्यालयातील मंडळ धिकारी, गावकामगार, तलाठी यांनी संगनमताने ज्या फाळणी बाराच्या आधारे फेरफार केले त्या फाळणी बाराचे खरे दप्तरच गहाळ करण्यात आले असून भोर येथील भूमापन अधिकाऱ्यांनी एकाच जमिनीचे दोन वेगळे नकाशे तयार करुन जमीन मालक शेतकरी भानुदास शिवराम खुटवड यांची फसवणूक केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, फसवणुक झालेल्या शेतकऱ्याने माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान आत्महत्त्या करण्याचा इशारा शासनास दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून शेतकऱ्याची फसवणूक करणाऱ्या संबंधित अधिकारी व दलाल यांच्याविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१६-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही, फेरफार क्र. १०७ हा इकरारपत्राचा आहे. तथापि, मौजे बारे खुर्द, ता.भोर, जि.पुणे या गावामध्ये १९६२ मध्ये पोटहिस्सा मोजणी होऊन नवीन नकाशे व फाळणीबारा तयार केले. सदर फाळणीबारा व नकाशे यानुसार सर्व्हे नं. २०, ३६ व ३७ यामध्ये फाळणी होऊन हिस्सामध्ये बदल झालेला आहे. परंतु सर्व्हे नं. ३८, ३९ मध्ये कोणतेही हिस्से झालेले नाहीत. तर सर्व्हे नं. ३६ मध्ये पुर्वीच्या सुडपत्रकात १४ हिस्से आहेत व १९६२ च्या फाळणी नकाशास एकूण ३० हिस्से आहेत. पोटहिस्सा मोजणी करणे ही अर्धन्यायिक स्वरूपाची कार्यवाही असल्याने, सदरचे नकाशे व फाळणीबारा चुकीचे असल्याचे सिध्द करण्यासाठी श्री.भानुदास शिवराम खुटवड यांना जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख, पुणे यांनी दिनांक १६/०९/२०१६ च्या पत्रान्वये महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम २४७ अन्वये सक्षम प्राधिकारी यांचेकडे रितसर अपिल दाखल करण्याबाबत कळविले आहे.

(२) होय, हे खरे आहे.

श्री.खुटवड यांनी बारे खु. येथील फेरफार क्र. ३०७ रद्द करणेबाबत योग्य आदेश देणेचे व तसे न झालेस दिनांक २६/०१/२०१७ रोजी तहसिल कचेरी समोर आत्महत्या करणेचा इशारा दिलेला होता.तसेच श्री.भानुदास शिवराम खुटवड यांनी मंत्री, अन्न व नागरी पुरवठा, महाराष्ट्र राज्य तथा पालकमंत्री, पुणे जिल्हा यांचेकडे याच प्रकरणी दिनांक ०३/०५/२०१६ रोजी तक्रार अर्ज दिला आहे.

(३) श्री.खुटवड यांचा अर्जाच्या अनुषंगाने चौकशी करण्यात येऊन उपविभागीय अधिकारी, भोर उपविभाग, भोर यांनी दिनांक २३/०१/२०१८ च्या पत्रान्वये सदर फाळणीबारा रद्द करण्याबाबत तहसिलदार, भोर यांना कळविले आहे. तसेच सदर फाळणीबारामध्ये सर्व्हे नं. ३८ व ३९ बाबत तत्कालीन तलाठी यांनी चुकीच्या पध्दतीने नोंद केलेली असल्याने यांच्याविरूध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९६९ च्या नियम ८ अन्वये शिस्तभंग /विभागीय चौकशी प्रस्तावित केली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील नवीन शाळांच्या बृहत आराखडा तयार केल्याबाबत

**(७) २९१३० (०२-०५-२०१२). श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने जून, २००८ मधील १७ हजार प्रस्ताव रद्द करुन नवीन शाळांना मान्यतेबाबत बृहत आराखडा तयार केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात अनधिकृतरित्या सुरु असलेल्या माध्यमिक शाळांची संख्या किती व कोठे आहेत,

(३) असल्यास, सदरील संस्थांना मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (२३-१०-२०१८) :** (१) शासनाने बृहत आराखडा व त्यानुषंगाने प्राप्त झालेले प्रस्ताव रद्द करण्याचा निर्णय घेतला आहे.

(२) सन २०१५-१६ च्या यु-डायस डाटा नुसार राज्यात एकूण ८१ अनधिकृत माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा आहेत.

(३) अनधिकृत शाळांनी आवश्यक बाबींची पूर्तता करुन सादर केलेल्या प्रस्तावावर शासनस्तरावरुन उचित निर्णय घेण्यात येतो.

---

## राज्यात प्रदूषण व धुर मुक्त योजना यशस्वी करण्याबाबत

**(८) ३०५७४ (१२-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र व राज्य शासन भारत प्रदूषण मुक्त व धुर मुक्त योजना राबवित असतांना राज्यातील शालेयस्तरावर व अंगणवाडीत खिचडी शिजवण्यासाठी चुलीचा वापर होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रदूषण व धुर मुक्त योजना यशस्वी करण्यासाठी तसेच शाळेत चुली ऐवजी गॅसवर अन्न शिजवण्याची व्यवस्था करणेबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१५-१०-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) शालेय पोषण आहार योजनेंतर्गत आहार शिजविण्यासाठी शाळांमध्ये गॅस कनेक्शन उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला असून यानुसार कार्यवाही करण्याचे आदेश क्षेत्रिय यंत्रणांना देण्यात आले आहेत. यानुसार कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## धुळगाव (ता.येवला, जि.नाशिक) येथे यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना राबविण्याबाबत

**(९) ३१४४१ (०८-०८-२०१७). श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक २७१७६ ला दिनांक ७ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धुळगाव (ता.येवला, जि.नाशिक) येथे विमुक्त जाती, भटक्या जमाती घटकांसाठी यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत योजना राबविणेसाठी गटविकास अधिकारी, येवला यांनी दिनांक २० ऑक्टोबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास जमीन उपलब्ध करुन देऊनही माहे मे, २०१७ पर्यंत सदर योजना राबविणेसाठी समाजकल्याण विभाग, नाशिक यांनी शासनाकडे प्रस्ताव सादर केला नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, जमिनीच्या मोजणीतील दिरंगाईमुळे समाजकल्याण विभागास प्रत्यक्ष ताबा प्राप्त झालेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीमध्ये काय आढळून आले वा तद्नुसार संबंधितांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) तसेच धुळगाव येथे यशवंतराव चव्हाण मुक्त वसाहत निर्माण करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२३-१०-२०१८) :** (१), (२), (३), (४) व (५) या वसाहतीसाठी आवश्यक असणाऱ्या जमिनीचा ताबा मिळाल्यानंतर हा प्रस्ताव मान्यतेबाबत पुढील कार्यवाही करण्यात येईल. याबाबत समाजकल्याण अधिकारी, नाशिक यांच्याकडे पत्र व्यवहार करण्यात येत आहे

---

## शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात (मेडीकल) नागपूर येथे पाण्याची सुविधा उपलब्ध करण्याबाबत

**(१०) ३२९०८ (१८-०८-२०१७). श्री.प्रकाश गजभिये, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकिय वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय (मेडीकल) नागपूर येथे कोटयवधी रूपये खर्च करून पिण्याच्या पाण्यासाठी लावण्यात आलेले वॉटर कूलर बंद असल्यामुळे रूग्णांना पिण्याचे पाणी बाहेरून विकत घ्यावे लागत असल्याचे दिनांक ६ मे, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रुग्णालयात राज्यातील बरेच रुग्ण उपचारासाठी येत असतात त्यांच्यासोबत त्यांचे कुटुंबिय असतात, परंतु या ठिकाणी पाण्याची सुविधा नसल्यामुळे काही व्यक्ती पाच रुपये दराने पाण्याची बॉटल विकत असून दररोज हजारो रुपये कमवित आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन रुग्णांना व त्यांच्या नातेवाईकांना पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (११-१०-२०१८) :** (१) व (२) नाही.
(३) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय, नागपूर या संस्थेमध्ये दररोज १८ लाख लिटर पाण्याचा पुरवठा करण्यात येत असून, सदरहू पाणीपुरवठा संस्थेकरीता पुरेसा आहे.
(४) लागू नाही.

---

## पुर्णा (जि.परभणी) येथील पूर्णा एफ (३५) परभणी संस्थेची चौकशी करण्याबाबत

**(११) ३४०८२ (१८-०८-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुर्णा (जि.परभणी) येथील पुर्णा एफ (३५) परभणी या संस्थेची चौकशी करण्याबाबत विश्वस्त सदस्य, पुर्णा शिक्षण समिती, पुर्णा यांनी मा.मुख्यमंत्री यांच्याकडे निवेदन सादर केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त संस्थेने गत १० वर्षापासून गैरविश्वस्त, एकाच कुटुंबांच्या व्यक्तीची गैर व दडपशाही मार्गाने नेमणूक करुन संस्थेचा ताबा घेतला असून संस्थेवर अस्तित्वात असलेल्या सहा विश्वस्थ (अधिकृत) सदस्यांना वगळून खोटे दस्ताऐवज तयार करुन अवैध मार्गाने अध्यक्ष, उपाध्यक्ष व इतर सदस्य असे बोगस स्वंयघोषित कार्यकारी मंडळ तयार करुन शासकीय अनुदानाचा भ्रष्ट मार्गाने गैरवापर चालू केल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन या गैरविश्वस्त मंडळामार्फत शासनाच्या १०० टक्के अनुदानाचा गत १० वर्षापासून सुरु असलेला कोटयवधी रुपयांचा गैरव्यवहार रोखण्याबाबत कार्यवाही करुन संबंधित दोषी व्यक्तींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३०-१०-२०१८) :** (१) यासंदर्भातील निवेदन आढळून आले नाही.
(२) व (३) सदर संस्थेमार्फत अभिनव विद्या विहार प्राथमिक व माध्यमिक शाळा, पुर्णा ही शाळा चालविण्यात येते. या शाळेच्या माध्यमिक विभागास संबंधित आदेशानुसार सन २०१३ पासून वेतनेतर अनुदान दिले जात असून प्राथमिक शाळा जून २०१६ पासून १०० टक्के अनुदान प्राप्त झाल्याने प्राथमिक विभागास वेतनेतर अनुदान देण्यात येत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## उमरखेड व महागाव (जि.यवतमाळ) तालुक्यात हरियाली वृक्ष लागवड व भारत निर्माण योजनेत अपहार झाल्याबाबत

**(१२) ३४१३० (१८-०८-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) उमरखेड व महागाव (जि.यवतमाळ) तालुक्यात हरियाली वृक्ष लागवड व भारत निर्माण योजनेत अपहार झाल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने वृक्ष लागवड व भारत निर्माण योजनेत अपहार करणाऱ्या दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१२-१०-२०१८) :** (१) जिल्हाधिकारी, यवतमाळ यांच्या दिनांक २४/०९/२०१८ च्या अहवालानुसार तालुका उमरखेड जिल्हा यवतमाळ अंतर्गत ग्रा.पं. ढाणकी येथील मौजे टेंभेश्वरनगर येथे भारत निर्माण योजनेंतर्गत अपहार झालेला आहे. तथापि, महागाव तालुक्यात भारत निर्माण योजनेंतर्गत कोणताही अपहार झालेला नाही.

महागाव तालुक्यात हरियाली योजना राबविण्यात आली नसून उमरखेड तालुक्यात सदर योजनेंतर्गत वृक्ष लागवड अयशस्वी झाल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) हरियाली योजनेंतर्गत उमरखेड तालुक्यात केलेली वृक्ष लागवड अयशस्वी झाल्यामुळे करण्यात आलेला खर्च निष्फळ ठरल्यामुळे संबंधित अध्यक्ष / सचिव, पाणलोट विकास समिती यांचेवर मुख्य कार्यकारी अधिकारी तथा कार्यकारी अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यवतमाळ यांच्याकडून वसुली निश्चित करण्यात आली आहे.

उमरखेड तालुका जिल्हा यवतमाळ अंतर्गत ग्रा.पं.ढाणकी येथील मौजे टेभेश्वरनगर येथे भारत निर्माण योजनेंतर्गत झालेल्या अपहार प्रकरणी समिती अध्यक्ष व सचिव यांचेविरुध्द पोलीस स्टेशन बिटरगाव येथे दिनांक ०८/१२/२०११ रोजी FIR क्र.४५/११ नोंदविला आहे.

(३) वरील प्रमाणे.

---

## राज्यातील आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांचे मृत्यू रोखण्याबाबत

**(१३) ३६९४६ (०३-०१-२०१८). श्री.अनिल भोसले, श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.सतिश चव्हाण, ॲड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक ३०८८४ ला दिनांक २७ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ११०० आदिवासी आश्रमशाळांची स्थिती दयनीय असून मागील दशकात ७९३ विद्यार्थ्यांचा सर्पदंश, ताप, किरकोळ आजार इत्यादी कारणांमुळे मृत्यू झाल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनामार्फत चौकशी करण्यात आली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर आश्रमशाळांची स्थिती सुधारणे व विद्यार्थ्यांचे मृत्यू रोखण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (२८-०९-२०१८) :** (१) व (२) सन २००१-२००२ ते सन २०१२-१३ या शैक्षणिक वर्षात सुमारे ७९३ विद्यार्थ्यांचा वेगवेगळया कारणांनी मुत्यू झाला आहे. ४४१ मुले व ३५२ मुली असे एकूण ७९३ विद्यार्थ्यांचा मुत्यू झाल्याची बाब आढळून आली आहे.

सदर आश्रमशाळांतील विदयार्थ्याचे मुत्यू रोखण्यासाठी उपाययोजना सुचविण्याकरीता आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. शाआशा-२०१६/प्र.क्र.१२५/का.१३, दिंनाक ३० मे, २०१६ अन्वये डॉ सुभाष साळुंखे, सेवानिवृत्त महासंचालक, आरोग्यसेवा, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली ११ सदस्यांची तांत्रिक समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समितीने विद्यार्थ्यांच्या मुत्यूबाबत अल्पकालीन व दीर्घकालीन स्वरुपाच्या शिफारशी सुचविल्या असून बहुतांशी शिफारशीची अंमलबजावणी करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## देशात उच्च शिक्षणातील मागासवर्गीयांची नोंदणी, महिला शिक्षणाचे व नोकऱ्यांमधील प्रमाण फारच कमी असल्याबाबत

**(१४) ३८५६० (०४-०४-२०१८). श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देशात उच्च शिक्षणातील मागासवर्गीयांची नोंदणी व महिला शिक्षणाचे प्रमाण, नोकऱ्यांमधील प्रमाण फारच कमी असल्याचे केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्रालयाने जारी केलेल्या आकडेवारीवरून दिनांक १० जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मागासवर्गीयांच्या उन्नतीसाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१२-१०-२०१८) :** (१), (२) व (३) संबंधित विभागांकडून माहिती प्राप्त करुन घेण्यात येत आहे.

---

## कासार बिरंबे (ता.कराड, जि.सातारा) येथील हनुमान पाणीपुरवठा संस्थेवर कारवाई करण्याबाबत

**(१५) ३८९६३ (०३-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ३७०६२ ला दिनांक २२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कासार बिरंबे (ता.कराड, जि.सातारा) येथील हनुमान पाणीपुरवठा संस्थेच्या गैरकारभाराबाबत लोकप्रतिनिधी व ग्रामस्थांनी माहे नोव्हेंबर, २०१५ मध्ये संबंधिताकडे तक्रार करण्यात येवूनही कोणतीच कारवाई करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित दोषींवर कारवाई करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१९-१०-२०१८) :** (१) नाही.

(२) श्री.हनुमान सहकारी पाणीपुरवठा संस्थेच्या सभासदांनी संस्थेच्या चेअरमनविरुद्ध व संस्थेच्या कारभाराविरुद्ध केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने उपनिबंधक, सहकारी संस्था, कराड यांनी संबंधित संस्थेचे चेअरमन, तक्रारदार, कॅनरा बँक व बँक ऑफ इंडिया या दोन्ही बँकांच्या अधिकाऱ्यांसमवेत दिनांक २७/११/२०१५ रोजी आढावा बैठक घेऊन प्राथमिक चौकशी केली. मात्र तक्रारदार ४४ सभासदांपैकी २५ सभासदांनी तक्रार अर्जातील त्यांच्या सह्या खोट्या असल्याचे व संस्थेच्या कर्जाबाबत त्यांची कोणतीही तक्रार नसल्याचे लेखी म्हणणे दिले आहे.

तद्नंतर जिल्हाधिकारी, सातारा यांनी प्रकरणी दोन्ही बँकांचे वरिष्ठ अधिकारी, तक्रारदार सभासद व संबंधित इतर अधिकाऱ्यांची दिनांक ७/१०/२०१६ रोजी बैठक घेतली. सदर बैठकीमध्ये जिल्हाधिकाऱ्यांनी दिलेल्या निर्देशानुसार सदर उपसा सिंचन योजनेच्या क्षमतेची तपासणी करण्याच्या सूचना जलसंपदा विभागाच्या कार्यकारी अभियंत्यांना देण्यात आलेल्या आहेत. तसेच सभासदांच्या कर्जविषयक कागदपत्रांची तपासणीची कार्यवाही कॅनरा बँक व बँक ऑफ इंडिया या दोन्ही बँकांच्या विभागीय कार्यालयामार्फत सुरु आहे.

संस्थेच्या सभासदांच्या खोट्या सह्या करुन फसवणूक केल्याबाबत पोलीस स्टेशन, कराड येथे सभासदांनी दाखल केलेल्या तक्रारींच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, सातारा यांनी दिलेल्या निर्देशानुसार गुन्हे दाखल करण्यात आले आहेत.

उपनिबंधक, सहकारी संस्था, कराड यांनी प्रकरणाची सविस्तर चौकशी केली असून त्यांच्या अहवालातील अभिप्रायांच्या अनुषंगाने जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सातारा यांनी तक्रार अर्जातील मुद्दे व संस्थेतील कामकाजातील अनियमितता याबाबत तपासणी करण्यासाठी संस्थेच्या नोंदणीपासून दिनांक ३१/३/२०१६ अखेर पर्यंत चाचणी लेखापरिक्षण करण्याचे आदेश दिनांक ३०/११/२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार पुढील कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शारिरीक शिक्षण महाविद्यालयांना अनुदान देण्याबाबत

**(१६) ३८९८७ (०५-०४-२०१८). श्री.प्रकाश गजभिये : दिनांक ९ डिसेंबर, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक २ मधील प्रश्न क्रमांक १७७१९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात किती शारिरीक शिक्षण महाविद्यालये आहेत,

(२) असल्यास, शारिरीक शिक्षण महाविद्यालयामार्फत किती उत्कृष्ट खेळाडू निर्माण करण्याचे काम केले आहे,

(३) असल्यास, सर्व शारिरीक शिक्षण महाविद्यालयांना अनुदान देण्याचा शासनाचा विचार आहे काय,
(४) असल्यास, केव्हापासून अनुदान देण्यात येणार आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०८-२०१८) :** (१) एकूण ९० महाविद्यालये आहेत.
(२) एकूण ३०७३ खेळाडू.
(३) असा कोणताही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन नाही.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ येथील श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयातील विविध पदे सेवाजेष्ठतेनुसार भरण्याबाबत

**(१७) ३९२३८ (०४-०४-२०१८). श्री.हरिसिंग राठोड, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ येथील श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात दंत वैद्यकीय अधिकारी व अपघात वैद्यकीय अधिकारी अशी एकूण २३ पदे मंजूर आहेत, हे खरे आहे काय,
(२) तसेच सदर वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात प्रशासनाने वर्ग ४ ची जेष्ठता यादी डावलून सरळसेवेने कनिष्ठ लिपिकांची पदे भरली असल्याचे माहे जुलै, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर पदे नियमित न भरल्याने रुग्णांची गैरसोय होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दंत वैद्यकीय अधिकारी व अपघात वैद्यकीय अधिकारी तसेच सेवाजेष्ठता यादी डावलून सरळसेवेत भरलेली

कनिष्ठ लिपिकांची पदे रद्द करुन सेवाजेष्ठतेने पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०५-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही.
(४) श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयामध्ये दंत वैद्यकीय अधिकारी व अपघात वैद्यकीय अधिकारी यांची २३ पदे मंजूर असून सदर पदे बंधपत्रित उमेदवारांमधून भरण्यात येतात. बंधपत्रित उमेदवार उपलब्ध न झाल्यास सदर पदे अबंधपत्रित उमेदवारांमधून १२० दिवसाच्या तत्वावर तात्पुरत्या स्वरुपात अधिष्ठातास्तरावर भरण्यात येतात.

तसेच श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय यांच्या आस्थापनेवरील कनिष्ठ लिपीकांची ४८ पदे मंजूर असून सदर पदांपैकी ३६ पदे सरळसेवेतील कोटयातील आहेत तर १२ पदे पदोन्नती कोटयातील आहे. सरळसेवेच्या कोटयातील ३६ पदे व पदोन्नती कोटयातील ९ पदे भरण्यात आलेली आहेत. पदोन्नती कोटयातील ३ रिक्त असलेली पदे भरतांना एका कर्मचाऱ्याने आपण ज्येष्ठ असल्याबाबत आक्षेप घेतला होता. त्यानुसार पदोन्नत केलेल्या एका कर्मचाऱ्याला पदावनत करण्यात आले असून पुढील कार्यवाही चालू आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## देवना (ता.येवला, जि.नाशिक) सिंचन प्रकल्पाच्या आराखड्याबाबत

**(१८) ३९३८५ (०४-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३४८८६ ला दिनांक १८ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देवना (ता.येवला, जि.नाशिक) सिंचन प्रकल्पाच्या सर्वसाधारण आराखड्यास सक्षमस्तरावरून मान्यता देण्यात येवूनही सदर प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल माहे जानेवारी, २०१८ पर्यंत शासनाकडे मंजुरीसाठी पाठविण्यात आलेला नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, देवना सिंचन प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल शासनाकडे पाठवावा अशी स्थानिक लोकप्रतिनिधींनी माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान तापी पाटबंधारे विकास महामंडळाच्या कार्यकारी संचालकांकडे मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर योजनेचा सर्वसाधारण आराखडा/सविस्तर प्रकल्प अहवाल प्रशासकीय मंजुरीसाठी शासनाकडे पाठविण्याबाबत महामंडळाकडून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२६-०९-२०१८) :** (१) साठवण तलाव देवना, ता.येवला ची सिंचन क्षमता ६०० हेक्टरपेक्षा कमी असल्याने दिनांक १८/१/२०१८ रोजी जलसंधारण विभाग, नाशिक यांच्याकडे हस्तांतरीत करण्यात आलेला आहे.
(२) हे अंशत: खरे आहे. कपात सूचना क्र. ६ अन्वये मा.विधानसभा सदस्य यांनी मागणी केलेली होती.
(३) मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांच्याकडून योजनेच्या माती धरणाच्या काटछेदाचे संकल्पन प्राप्त झालेले आहे. सदर काटछेद संकल्पनानुसार सविस्तर प्रकल्प अहवाल करण्याचे काम उपविभागीय स्तरावर प्रगतीत आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत

**(१९) ३९८३५ (०४-०४-२०१८). श्री.विक्रम काळे : दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक ३३५५४ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात**

सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील भटक्या, विमुक्त जातीच्या आश्रम शाळेतील कार्यरत लिपीक / सेवक / कांमाठी / स्वयंपाकी / वसतिगृह अधीक्षक / प्रयोगशाळा सहाय्यक / परिचर / नाईक इत्यादी शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबध्द पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने निर्णय दिला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्या निर्णयानुसार शासनस्तरावरुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (१५-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळेतील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शालेय शिक्षण विभागाच्या धर्तीवर कालबद्ध पदोन्नती देण्याबाबत मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार या विभागाने शासनपत्र दिनांक १०/०३/२०१७ अन्वये ज्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयाने याचिकाकर्ता कर्मचाऱ्यांना कालबद्ध पदोन्नती योजनेचा लाभ देण्याबाबतचे निर्देश दिले आहेत. अशा कर्मचाऱ्यांची वैयक्तिक पात्रता शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक ३०/०४/१९९८ च्या शासन निर्णयानुसार तपासून जर याचिकाकर्ता कर्मचारी कालबद्ध पदोन्नती योजनेस पात्र ठरत असल्यास त्यांना सदरहू योजनेचा लाभ देण्याची कार्यवाही करण्याचे निर्देश देण्यात आले आहेत.

---

## शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये औषधशास्त्र पदव्युत्तर अभ्यासक्रम खंडीत केल्याबाबत

**(२०) ४०६०० (०४-०४-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाड्यातील एकमेव शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालयांमध्ये सन १९९७ पर्यंत मुख्य औषधशास्त्र विषयामध्ये सुरु असलेला पदव्युत्तर अभ्यासक्रम २० वर्षापासून खंडीत झाला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबतची सर्वसाधारण कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने सदर अभ्यासक्रम पुन्हा सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०५-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय औरंगाबाद येथील मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयातील पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाची मान्यता खंडीत झाली आहे.
(२) मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयातील संबंधित संस्थेतील प्राध्यापक हे पद रिक्त असल्याने अभ्यासक्रमाची मान्यता खंडीत झाली आहे.
(३) भारतीय दंत परिषदेच्या दिनांक १/९/२०१७ च्या अधिसूचनेतील तरतूद विचारात घेऊन शासकीय दंत महाविद्यालय व रुग्णालय औरंगाबाद या संस्थेतील मुखरोगनिदान व क्ष-किरणशास्त्र या विषयातील वरीष्ठ सहयोगी प्राध्यापकास पदोन्नतीच्या वरीष्ठ पदाचे प्राध्यापक हे नामाभिधान प्रदान करण्यास शासन मान्यता नुकतीच प्रदान करण्यात आली आहे. त्यामुळे सदर अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी सुलभता निर्माण झाली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील संजय गांधी राष्ट्रीय उद्यानासाठी संपादित केलेल्या जमिनीबाबत

**(२१) ४०६२० (०४-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील संजय गांधी राष्ट्रीय उद्यानासाठी संपादित केलेल्या जमिनीच्या संदर्भात याचिका क्र. १४६५/७५ सन १९७९ मध्ये अर्जदार व प्रतिवादी यांच्यामध्ये समझोता करार करण्यात आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यामध्ये मालाड येथील सर्व्हे क्र. मधील १४८८ एकर ३३ गुंठे व १२ आणे जमीन वन विभागाची खरेदी करण्यात आली होती, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, १४८८ पैकी ८४८ एकर जमीन वन विभागाला परत करण्यात आली आहे व उर्वरीत ६४० एकर १२ गुंठे ४ आणे जमिनीपैकी ५७२ एकर २९ ॥ गुंठे इतकी जमीन महापालिकेला तबेले हटविण्यासाठी देण्यात आली होती तसेच ४४ एकर ३३ गुंठे १२ आणे जमीन सुधारित जलाशयासाठी देण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, ही ५७२ एकर जमीन पुन्हा वन विभागाकडे वर्गीकृत होणे आवश्यक होते त्याप्रमाणे ती वन विभागाला वर्गीकृत झाली आहे काय, याची माहिती मा.न्यायालयात देण्यात आली नाही त्याची कारणे काय आहेत,
(५) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.

मा.उच्च न्यायालयात संकीर्ण याचिका क्र. १४६५/७५ नुसार मौजे मालाड सर्वे क्र. २३९/१ चे १४८८ एकर ३३ गुंठे १२ आणे क्षेत्राचे मूळ मालक व शासन यांच्यात दिनांक ३/१२/१९७९ रोजी समझोता करार करण्यात आला आहे.
(२) महाराष्ट्र खाजगी वने (संपादन) अधिनियम १९७५ चे तरतुदींतर्गत खाजगी वनांचे क्षेत्र, विहित प्रणालीचे अंमलाअंती राखीव वने म्हणून शासनविहित करण्यात आले आहे. या जमिनी शासनाव्दारे खरेदी करण्यात आलेल्या नाहीत.
(३) व (४) दिनांक ०३/१२/१९७९ च्या समझोता करारानुसार १४८८ एकर ३३ गुंठे १२ आणे पैकी ८४८ एकर २० गुंठे १२ आणे क्षेत्र खाजगी वने च्या व्याख्येखाली धरून, महाराष्ट्र खाजगी वने (संपादन) अधिनियम १९७५ चे

अंतर्गत विधीगतरित्या शासनविहित केले. उर्वरित ६४० एकर १२ गुंठे ४ आणे क्षेत्र, विविध प्रयोजनाखाली खातेदाराव्दारे देण्यात आल्याने / संपादित झाल्याने व खातेदाराचे ताब्यात नसल्याने “वने” अथवा ‘खाजगी वने’ च्या व्याख्येतून वगळण्यात आले आहे. शासनाव्दारे या जमिनीचा दावा केला जाणार नाही, असे मा.उच्च न्यायालयाव्दारे “समझोता करार” वर आदेश पारित करताना नमूद केले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वर्धा जिल्ह्यातील निम्न वर्धा प्रकल्प पुनर्वसन आणि कालवे धाम प्रकल्पांची उंची वाढविण्यासाठी वनजमिनीचा प्रस्ताव आणि कार प्रकल्पांच्या कामांना गती देण्याबाबत

**(२२) ४०६५१ (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वर्धा जिल्ह्यातील निम्न वर्धा प्रकल्प पुनर्वसन आणि कालवे धाम प्रकल्पांची उंची वाढविण्यासाठी वनजमिनीचा प्रस्ताव आणि कार प्रकल्पांच्या कामांना गती देण्याच्या सूचना मा.मुख्यमंत्री महोदयांनी वर्धा जिल्ह्याच्या माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान झालेल्या आढावा बैठकीत जिल्हाधिकाऱ्यांना दिल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२४-१०-२०१८) :** (१) होय.
(२) निम्न वर्धा प्रकल्पांतर्गत मौजा निंबोली गावाचे पुनर्वसन वगळता उर्वरित गावांचे पुनर्वसन कामे ९५ टक्के पूर्ण झालेली आहेत. तसेच जुन्या नागरी सुविधांच्या दुरुस्तीची कार्यवाही प्रगतीपथावर आहे.

धाम उंची वाढ प्रकल्पांचे Catehment Area Treatment Plan चे प्रस्तावास मुख्य वनरक्षक यांची मान्यता प्राप्त करण्यात आली आहे.

राज्य तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांनी धाम प्रकल्पाची उंची वाढविण्याचा सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावावर उपस्थित केलेल्या शेऱ्यांचे अनुपालन राज्य तांत्रिक सल्लागार समितीस सादर करण्याची कार्यवाही क्षेत्रियस्तरावर प्रगतीत आहे.

कार नदी प्रकल्पाचे लोहारी सावंगा वितरीकेवरील जलसेतुचे काम प्रगतीपथावर असून प्रकल्पाचे उर्वरित कामे माहे जून, २०१९ पर्यंत पूर्ण करण्याचे नियोजित आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हरिहरेश्वर (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथे विकास कामे करण्याबाबत

**(२३) ४०८६५ (०४-०४-२०१८). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हरिहरेश्वर (ता.श्रीवर्धन, जि.रायगड) येथे विकास कामे करण्यासाठी शासनाकडून रुपये ११ कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर कामे ही अपूर्णावस्थेत असून कामामध्ये अनियमितता आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने विकास कामे पूर्ण करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०३-१०-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

श्री.क्षेत्र हरिहरेश्वर येथील पर्यटन स्थळांच्या विकास कामांसाठी रुपये ९०८.६३ लक्ष निधी उपलब्ध करुन दिलेला आहे.

(२) हे खरे नाही.

हरिहरेश्वर येथील मंजूर कामांपैकी नवाब लेक व परिसर, हरिहरेश्वर मंदिर परिसर, अस्थि विसर्जन परिसर, स्मशानभूमी परिसर, एन्फ्रास्ट्रक्चर, भूमी सुधारणा इत्यादी कामे पूर्ण करण्यात आलेली आहेत. धर्मशाळेचे काम सदर जागा वन विभागाच्या अखत्यारित असल्यामुळे व लॅण्डस्केपिंगचे काम सर्व स्थापत्य कामे पूर्ण झाल्याशिवाय करता येणे शक्य नसल्यामुळे प्रलंबित आहेत.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात शालेय विद्‌यार्थ्यांच्या आरोग्य तपासणीबाबत

**(२४) ४०९६६ (०४-०४-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात शालेय विद्‌यार्थ्यांची आरोग्य तपासणी तालुकास्तरावर प्राथमिक आरोग्य केंद्रामार्फत करण्यात येत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर आरोग्य तपासणी ही वय वर्षे १ ते १८ या वयोगटातील विद्‌यार्थ्यांची केली जाते व काही ठिकाणी आरोग्य तपासणी करताना वयोगटाबाबत एकवाक्यता नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर आरोग्य तपासणी कोणत्या वयोगटातील विद्‌यार्थ्यांची व वर्षातून किती वेळा करावयाची याबाबत सूचना क्षेत्रियस्तरावरील अधिकाऱ्याना देणे गरजेचे आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (१५-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.

राज्यात शालेय विद्यार्थ्यांची आरोग्य तपासणी ही राष्ट्रीय बाल स्वास्थ कार्यक्रमांतर्गत मंजूर पथकांमार्फत करण्यात येते.

(२) केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन सदर आरोग्य तपासणी ही अंगणवाडीस्तरावरील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची आणि शाळा स्तरावरील ६ ते १८ वर्षे वयोगटातील विद्यार्थ्यांची करता येते.

(३) सर्व आरबीएसके पथकांना आरोग्य तपासणी करण्याबाबतच्या केंद्र व राज्य शासनाच्या मार्गदर्शक सूचना राज्यस्तरावरून निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

(४) शाळा स्तरावरील ६ ते १८ वयोगटातील विद्यार्थ्यांची तपासणी वर्षातून एक वेळा व अंगणवाडी स्तरावरील ० ते ६ वर्षे वयोगटातील बालकांची तपासणी वर्षातून दोन वेळा करण्यात येते. याबाबत जिल्हा/तालुकास्तरावरील सर्व वैद्यकिय अधिकारी यांना सूचना देण्यात आलेल्या आहेत व त्याबाबत दरमहा सखोल आढावा घेण्यात येतो.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागाच्या शिष्यवृत्तीत गैरव्यवहार झाल्याबाबत

**(२५) ४११२४ (०५-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सामाजिक न्याय व आदिवासी विकास विभागामार्फत देण्यात येणाऱ्या कोटयवधी रुपयाच्या शिष्यवृत्तीत गैरव्यवहार झाल्यामुळे तत्कालीन पोलीस महासंचालक, श्री.के. वेंकटेशम यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या समितीचा अहवाल दिनांक २४/०७/२०१७ रोजी शासनास सादर करण्यात आला असूनही संबंधित दोषींवर कोणतीही कार्यवाही करण्यात आलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (१२-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) विशेष चौकशी पथकाने सादर केलेल्या अंतिम अहवालातील लेखापरीक्षणातील आकडेवारीची पडताळणी करण्याची व वसुलपात्र रक्कम संबंधित संस्थांकडून वसूल करण्याची आणि संबंधित दोषी संस्थावर नियमानुसार कारवाई करण्याची आवश्यक ती पुढील कार्यवाही आयुक्त, समाजकल्याण पुणे यांच्या अधिनस्थ संबंधित सहायक आयुक्त, समाजकल्याण यांच्यामार्फत सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात वरिष्ठ महाविद्‌यालयात तासिका तत्वावरील प्राध्यापकांना मानधन देण्याबाबत

**(२६) ४१२७२ (०१-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक ३८१६८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात वरिष्ठ महाविद्‌यालयात तासिका तत्वावर माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय एकूण संख्या किती आहे,
(२) असल्यास, त्यांना मिळणारे मानधन हे अल्प असून ते दरमहा मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन मानधनात वाढ करुन ते दरमहा मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३०-१०-२०१८) :** (१) राज्यात वरिष्ठ महाविद्‌यालयात तासिका तत्वावर माहे मार्च, २०१८ पर्यंत कार्यरत असणाऱ्या प्राध्यापकांची जिल्हानिहाय संख्या पुढीलप्रमाणे आहे :-

| जिल्हा | तासिका तत्वावर कार्यरत प्राध्यापकांची संख्या |
|---|---|
| मुंबई | ३१० |
| ठाणे | ७६ |
| पालघर | १२ |
| रायगड | ११ |
| सिंधुदूर्ग | ०५ |
| रत्नागिरी | ७३ |
| जळगाव | ६७ |
| धुळे | १५३ |
| नंदुरबार | ९९ |
| सोलापूर | ५६३ |
| अमरावती | ३९९ |
| अकोला | ३२६ |
| बुलडाणा | २७२ |
| यवतमाळ | २९७ |
| वाशिम | २२१ |
| नागपूर | ७३० |
| वर्धा | ८० |
| भंडारा | १२५ |
| गोंदिया | १७२ |
| चंद्रपुर | २८७ |
| गडचिरोली | ८८ |
| कोल्हापूर | ९२६ |
| सांगली | ६६७ |
| सातारा | ७१८ |
| औरंगाबाद | ४४४ |
| जालना | ११२ |
| बीड | ३१२ |
| उस्मानाबाद | १८१ |

| | |
|---|---|
| पुणे | १३२ |
| नाशिक | ४१ |
| अहमदनगर | ६३ |
| नांदेड | ५३० |
| लातूर | ३८० |
| परभणी | २४० |
| हिंगोली | ५३ |
| **एकुण** | **९१६५** |

(२) व (३) होय, तथापि, तासिका तत्वावरील प्राध्यापकांच्या मानधनात वाढ करणेबाबत तसेच सदर मानधन दरमहा अदा करणेबाबत कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठातील सुरक्षा रक्षकांना पोलिसांचे अधिकार आणि विशेष पोलीस अधिकार देण्याबाबत

**(२७) ४१२९५ (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठातील सुरक्षा रक्षकांना पोलिसांचे अधिकार आणि विशेष पोलीस अधिकारी म्हणून नियुक्त करण्याचा निर्णय पुणे विद्यापीठाने माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घेतला, खरे आहे काय,
(२) असल्यास, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन परिसरातील सुरक्षा रक्षकांना असणारा विशेष अधिकार पुणे विद्यापीठातील सुरक्षा रक्षकांना कोणत्या यंत्रणेकडून देण्यात आला आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार अशा विशेष अधिकाराचा वापर योग्य प्रकारे होण्याकरीता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१०-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## नागपूर येथील जिल्हा नियोजन विकास समितीच्या बैठकीत निधी खर्च केला नसल्याने संबंधित विभागांना नोटीस बजावल्याबाबत

**(२८) ४१३१० (०१-०८-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर येथील जिल्हा नियोजन विकास समितीच्या बैठकीत अनेक विभागांनी निधीच खर्च केला नसल्याने डीपीडीसीने मेडिकल, सार्वजनिक बांधकाम, प्राथमिक शिक्षण, सार्वजनिक आरोग्य विभागांसह विविध विभागांना नोटीस बजावल्या असल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने निधी खर्च न करणाऱ्या संबंधित विभागातील अधिकारी व कर्मचाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०५-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांच्या दिनांक २२/०१/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत मा.पालकमंत्री, नागपूर यांनी दिलेल्या निदेशाच्या अनुषंगाने मेडिकल, सार्वजनिक बांधकाम, प्राथमिक शिक्षण, सार्वजनिक आरोग्य विभागांसह विविध विभागांनी दिनांक ३१ मार्च, २०१८ अखेर प्राप्त झालेला निधी १०० टक्के खर्च केलेला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## देगलूर (जि.नांदेड) येथील नाफेडच्या खानापूर केंद्रावरील तुरीची तोलाई बारदान्याअभावी प्रलंबित राहिल्याबाबत

**(२९) ४२२१२ (०१-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देगलूर (जि.नांदेड) येथील नाफेडच्या खानापूर केंद्रावरील तुरीची तोलाई बारदान्याअभावी प्रलंबित असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, हरभरा तोलाईची समस्या गंभीर असून तोलाई करण्याच्या मागणीसाठी शेतकऱ्यांनी संताप व्यक्त केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन काय कार्यवाही वा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०१-११-२०१८) :** (१) नाही.

(२) व (३) नांदेड जिल्हयातील ९ खरेदी केंद्रापैकी देगलूर येथील खरेदी केंद्र दिनांक ५/२/२०१८ रोजी सुरु करण्यात आले होते. सदर खरेदी केंद्रावर सर्वात जास्त हरभरा खरेदी झाला आहे. यामध्ये २२५३ शेतकऱ्यांचा एकूण २८१०३.५० क्विंटल हरभरा खरेदी केलेला आहे. तसेच सदर खरेदी केंद्रावर पर्याप्त बारदाना उपलब्ध होता तसेच आवश्यकतेनुसार इतर ठिकाणाहून बारदानाचा पुरवठा करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मराठवाड्यातील जमिनीचा पोत खालावली असल्याबाबत

**(३०) ४२२१९ (०१-०८-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेडच्या माती परिक्षण प्रयोगशाळेच्या अहवालावरून मराठवाड्यातील जमिनीचा पोत मोठ्या प्रमाणात खालावली असून जमिनी नापीक होऊन उत्पादनात मोठी घट येण्याची शक्यता निर्माण झाली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, माती परिक्षणात राष्ट्रीय केमिकल फर्टीलायझर्सने कोणकोणत्या नमुनांच्या चाचण्या घेतल्या व त्यात काय निष्पन्न झाले, शासनाने जमिनीची पोत उंचावण्याबाबत कोणते प्रयोग हाती घेतले आहेत,
(३) असल्यास, त्यानुषंगाने जमिनीची पोत वाढवण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (११-१०-२०१८)** : (१) नाही, नांदेड जिल्ह्यामध्ये शेतकऱ्याला दोन वर्षातून एकदा त्यांच्या शेतजमिनीची मृद आरोग्य पत्रिका उपलब्ध करुन दिली जाते. सदर मृद आरोग्य पत्रिकेच्या अहवालानुसार जिल्ह्यातील जमिनीचा सामु साधारणत: ७.५ ते ८.०० च्या दरम्यान आहे. क्षारता ००१ ते ९९९ M/S दरम्यान आहे. वर्षनिहाय तपासणी करण्यात आलेल्या माती नमुन्याचे आधारे मातीचा सुपीकता निर्देशांक काढण्यात येतो. या अहवालातील स्फुरदाचे प्रमाण वगळता जमिनीचा सुपीकता निर्देशांक अत्यंत चांगल्या स्थितीत आहे. स्पुरदाचे प्रमाण वाढविण्याकरीता सेंद्रीय खताचा वापर, पिकांच्या अवशेषाचे शेतातच कंपोस्ट खत निर्मिती करुन वापर करणे व आवश्यकतेप्रमाणे स्फुरद युक्त रासायनिक खताचा वापर करणेबाबत शेतकऱ्यांना मार्गदर्शन करण्यात येत आहे. तसेच, विविध केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत हिरवळीचे खत व जिप्सम खतासाठी शेतकऱ्यांना अनुदान उपलब्ध केले जाते.
(२) नांदेड जिल्ह्यात राष्ट्रीय केमिकल्स फर्टीलायझर्सच्या माती परिक्षण प्रयोगशाळेस माती नमुने तपासणीचे लक्षांक देण्यात आलेले नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाच्या पुरातत्व सर्वेक्षण विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या जिल्ह्यातील ऐतिहासिक वास्तू/स्मारकांचे संवर्धन करण्याबाबत

**(३१) ४२२८३ (०१-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.विक्रम काळे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाच्या पुरातत्व सर्वेक्षण विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या २९ ऐतिहासिक वास्तू/स्मारकांचे संवर्धन करण्यासाठी पुरातत्व विभागाने व्हिजन प्लॅन तयार करुन केंद्र शासनाकडे रुपये २० कोटींचा प्रस्ताव सादर केला असल्याचे दिनांक १० मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरील प्रस्तावास केंद्र शासनाकडून मंजूरी मिळाली आहे काय,

(३) असल्यास, ऐतिहासिक वास्तूंचे संवर्धनाची कामे कोणत्या कालावधीत सुरु करण्यात येणार आहेत,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०३-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

या विभागाच्या अखत्यारीतील पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालयाच्या अंतर्गत येणाऱ्या २९ स्मारकांच्या संवर्धनासाठी कुठलाही व्हिजन प्लॅन तयार केला नसून रुपये २० कोटीचा कुठलाही प्रस्ताव केंद्र शासनाकडे सादर करण्यात आलेला नाही.

(२), (३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## धारुर (जि.बीड) येथील वनक्षेत्रात वणवा लावणाऱ्या संबंधित दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३२) ४२३६८ (०१-०८-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) धारुर (जि.बीड) येथे वनक्षेत्रात माहे मार्च, २०१८ मध्ये तीन वेळा वणवा लागला असल्याची बाब निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरील आग ही लागली नसून लावली असल्याबाबतची तक्रार नागपूर येथे करण्यात आली असता याबाबत वन अधिकारी यांनी तक्रारदारांना जेलमध्ये टाकु अशा धमक्या देऊन व दडपशाही केल्यामुळे तक्रारदारांना चौकशीसाठी येऊ दिले जात नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दोषी वन अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (११-१०-२०१८) :** (१) बीड वन विभागातील धारुर वन परिक्षेत्रात (जि.बीड) माहे मार्च, २०१८ मध्ये वन वणव्याच्या खालील दोन घटना निदर्शनास आलेल्या आहेत.

(१) मौ.हिंगणी फॉ.स.नं. ७१ येथे ३८.९६ हे. क्षेत्र जळीत झाले आहे.

(२) मौ.कासारी फॉ.स.नं. ३९६ येथे १.४० हे. क्षेत्र जळीत झाले आहे.

सदर दोन्ही प्रकरणी दिनांक ७/३/२०१८ रोजी वनगुन्हा नोंदविण्यात आलेला आहे.

(२), (३) व (४) उपरोक्त दोन्ही घटना मानवनिर्मित असून त्यानुषंगाने अज्ञात आरोपीविरुध्द गुन्हयांची नोंद करुन तपास करण्यात आलेला आहे. आरोपींचा शोध लागलेला नाही. सदर प्रकरणी तक्रारदार श्री.रणजित रणसिंग व श्री.विलास गवळी यांनी तक्रार दाखल केली होती. तथापि, तक्रारदार श्री.विलास गवळी यांचेविरुध्द धारुर वनपरिक्षेत्रातील मालकी क्षेत्रालगतच्या वन हद्दीतील खुणा नष्ट केल्याबाबत वनगुन्हा दिनांक ५/२/२०१८ नोंद केलेला आहे. तक्रारदार श्री.रणजित रणसिंग यांनी तक्रारीप्रमाणे क्षेत्रिय कामाची

पाहणी करण्यास दिनांक २४/३/२०१८ रोजी नकार दिला असून, प्रस्तुत प्रकरणी विभागीय वन अधिकारी, हिंगोली यांचा दिनांक १५/५/२०१८ रोजीचा चौकशी अहवाल अप्पर प्रधान मुख्य संरक्षक, (अकाष्ठ व वनोपज) नागपूर यांना प्राप्त झाला आहे. तथापि, तक्रारदाराच्या उपस्थितीत या प्रकरणी चौकशी न केल्याने, त्यांच्या उपस्थितीत चौकशी करुन, वास्तविक अहवाल सादर करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत.

---

## संगमेश्वर (जि.रत्नागिरी) तालुक्यातील सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांना पेन्शन मिळण्याबाबत

**(३३) ४२५४६ (०१-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) संगमेश्वर (जि.रत्नागिरी) तालुक्यातील १०७६ सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांना पेन्शन मिळाली नसल्याने पेन्शनधारक वृद्धांचे हाल होत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने वृद्धांना वेळेवर पेन्शन मिळण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१८-०९-२०१८) :** (१) नाही.

(२) विलंब झाला नसल्याने प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बीड जिल्ह्यातील स्वस्त धान्य दुकानदारावर कारवाई करण्याबाबत

**(३४) ४२६१५ (०१-०८-२०१८). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बीड जिल्ह्यात महिनाअखेर साडे चौदा हजार क्विंटल धान्य काळयाबाजारात विकले जात असल्याचा आरोप विविध संघटनानी पुराव्यासहीत केला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माहे फेब्रुवारी, २०१८ मध्ये स्वस्त धान्य दुकानदारांच्या मिळालेल्या मार्जिनमधुन खोटया सहया करुन चलन भरणा व परमीट तयार करुन तत्कालीन जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी स्वत:च्या आर्थिक फायदयासाठी बीड मधील एका काळयाबाजारातील धान्यमाफीयास धान्य विकले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त सर्व प्रकरणात संगनमताने काळाबाजार होत असल्यामुळे याबाबत अनेकदा तक्रारी करुनही शासनाने धान्यमाफीयावर व अधिकारी यांच्यावर कोणतीही कारवाई केली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन गरीबांना मिळणाऱ्या अन्नधान्यात कोटयावधी रुपयांची फसवणुक करणाऱ्या दोषींविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०५-१०-२०१८) :** (१) शिवसेना जिल्हा प्रमुख बीड यांनी दिनांक २३/०३/२०१८ रोजी शासकीय धान्य गोदाम, बीड मधून १४५०० क्विंटल धान्य अपहाराबाबत अर्ज सादर केला आहे.

(२), (३), (४) व (५) विविध संघटनांची निवेदने व वृत्तपत्रामधील प्रसिध्द बातमीच्या अनुषंगाने उप आयुक्त (पुरवठा), औरंगाबाद यांनी दिनांक २४/०३/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अपर जिल्हाधिकारी, बीड यांना चौकशी करण्याबाबत आदेशीत केले. त्यानुषंगाने अपर जिल्हाधिकारी, बीड यानी सदर प्रकरणी सखोल चौकशी करण्यासाठी दिनांक ११/०५/२०१८ रोजी ४ सदस्याचे पथक गठीत करुन अहवाल मागविला. सदरील पथकाने अहवाल दिनांक ०४/०७/२०१८ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे.

सदर अहवालाच्या अनुषंगाने तत्कालीन जिल्हा पुरवठा अधिकारी, तहसिलदार, नायब तहसिलदार, पुरवठा संबंधित अव्वल कारकून व गोदाम व्यवस्थापक यांना कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आलेल्या आहेत. तसेच उप आयुक्त (पुरवठा) यांनी उक्त अहवालावरुन तीन सदस्याचे पथक नियुक्त केले असून पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## मौजे माळढोक (ता.उत्तर सोलापूर, जि.सोलापूर) येथील वन्य प्राण्यांची संख्या घटल्याबाबत

**(३५) ४२६८५ (०१-०८-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माळढोक (ता.उत्तर सोलापूर, जि.सोलापूर) येथील पक्षी अभयारण्य व परिसरातील पाणी टंचाई व चारा टंचाईमुळे वन्य प्राण्यांच्या संख्येत मोठी घट झाल्याचे दिनांक ३ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाराष्ट्रातील इतर अभयारण्याप्रमाणेच माळढोक अभयारण्याकडे शासनाने विशेष लक्ष देऊन वन्य प्राण्यांच्या वृध्दीकरीता शासनस्तरावरुन काही ठोस कार्यक्रम हाती घेतला आहे काय,

(३) असल्यास, त्याचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२३-१०-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) महाराष्ट्रातील इतर अभयारण्याप्रमाणेच माळढोक अभयारण्यामध्ये वन्य प्राण्यांच्या संरक्षण व वृध्दीकरीता खालीलप्रमाणे उपाययोजना करण्यात येतात.

- गवताळ प्रदेशाची अधिवास विकास कामे करण्यात येतात.
- वन्यप्राण्यांना वनक्षेत्रात पिण्याचे पाणी उपलब्ध व्हावे याकरीता नैसर्गिक पाणवठे दुरस्ती, नविन पाणवठे तयार करणे, पाझर तलावातील गाळ काढणे इत्यादी कामे करण्यात येतात.
- वनक्षेत्रात वनवणवा लागु नये म्हणून जाळ रेषा घेण्यात येतात.
- वनक्षेत्रा लगतच्या गावांमध्ये वन्यप्राण्यांच्या संरक्षणाबाबत कार्यशाळा आयोजित करुन स्थानिक जनतेचे प्रबोधन करण्यात येते.
- कृत्रिम पाणवठे व वनतळ्यांची निर्मिती करण्यात येते.
- वनक्षेत्रात नियमितपणे वन कर्मचाऱ्यामार्फत गस्त करण्यात येते.

- उंच गवताची पट्टे पध्दतीने कापणी करुन चांगल्या प्रकारचे गवत लागवड करण्यात येते.
- माळढोक पक्षांच्या निरीक्षणासाठी मजूरांची नेमणूक करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीतील परीक्षा शुल्क, शिक्षण शुल्काची रक्कम ऑफलाईन पध्दतीने देण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(३६) ४२७९५ (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मागासवर्गीय विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीतील परीक्षा शुल्क, शिक्षण शुल्काची रक्कम शिक्षण संस्था, महाविद्यालयांना ऑफलाईन पध्दतीने देण्याचा निर्णय शासनाने माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निर्णय बदलण्यामागची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०५-१०-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) व (३) विविध विभागांच्या शिष्यवृत्ती, फ्रिशिपच्या योजनांकरीता माहिती व तंत्रज्ञान संचालनालयामार्फत विकसित करण्यात आलेली महा-डीबीटी प्रणाली पूर्णत: कार्यन्वित न झाल्याने पात्र विद्यार्थ्यांची शिष्यवृत्ती, फ्रि-शिपची रक्कम त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अदा करण्याचा निर्णय दिनांक २९/१/२०१८ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात येवून त्यानुसार कार्यवाही सुरु करण्यात आली.

मात्र, मार्च अखेरीस काही शैक्षणिक संस्थाकडील विद्यार्थ्यांचे शिष्यवृत्ती/फ्रिशीपचे अर्ज संबंधित प्राधिकारी यांच्याकडे मुदतीत सादर होऊ

शकले नाहीत. तसेच काही शैक्षणिक संस्थांकडील विद्यार्थ्यांचे अर्ज विलंबाने संबंधित प्राधिकारी यांच्याकडे सादर करण्यात आल्याने त्यावरील देय रक्कम शैक्षणिक संस्थांना प्राप्त झालेली नाही.

त्याचबरोबर सन २०१७-१८ हे वर्ष संपुष्टात आल्याने या वर्षातील शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्काची रक्कम आता विद्यार्थ्यांच्या खात्यात जमा केल्यास व अंतिम सत्रातील विद्यार्थ्यांनी सदर रक्कम महाविद्यालयात जमा न केल्यास शैक्षणिक संस्थेचे नुकसान होणार असल्याने, काही शैक्षणिक संस्थानी त्यांच्या महाविद्यालयात प्रवेशित विद्यार्थ्यांच्या शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्काची रक्कम थेट महाविद्यालयांना अदा करण्याबाबत मा.उच्च न्यायालयात याचिका दाखल केल्या होत्या. मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार सदरहू प्रकरणी उपाययोजना करण्याच्यादृष्टीने मा.मंत्रिमंडळाच्या मान्यतेने दिनांक १७ मे, २०१८ च्या शासन निर्णयान्वये केवळ सन २०१७-१८ मधील शैक्षणिक वर्षामध्ये, ज्या महाविद्यालय/शैक्षणिक संस्थांना संबंधित विभागांकडील मागासप्रवर्ग आणि आर्थिकदृष्टया मागासप्रवर्गातील विद्यार्थ्यांची शिक्षण शुल्क, परीक्षा शुल्काची रक्कम प्राप्त होऊ शकली नाही, अशा महाविद्यालय/शैक्षणिक संस्थांना त्यांचेकडील प्रवेशित पात्र मागासवर्गीय विद्यार्थ्यांपैकी लाभ अदा केलेले विद्यार्थी वगळून, उर्वरित विद्यार्थ्यांची अनुज्ञेय अभ्यासक्रमासाठी देय होणारी शिक्षण शुल्क परीक्षा शुल्काची रक्कम संबंधित शैक्षणिक संस्थेला काही अटी/शर्तीवर ऑफलाईन पध्दतीने अदा करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हयात लागवड केलेल्या फळबाग क्षेत्राचे नुकसान झाल्याबाबत

**(३७) ४२९१३ (०१-०८-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यात निर्माण झालेल्या दुष्काळी परिस्थितीमुळे रोजगार हमी योजनेतून सन १९९० पासून माहे मार्च, २०१८ अखेरपर्यंत लागवड केलेल्या ५०२४५ हेक्टरवरील फळबाग क्षेत्राचे नुकसान झाले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने फळबाग बागायतदार शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्याबाबत कोणती कार्यवाही वा उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (१८-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## संचालक स्थानिक निधी लेखापरिक्षण व संचालक लेखा व कोषागरे यांच्या आस्थापनेवरील रिक्त पदांबाबत

**(३८) ४३०८४ (०१-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) संचालक, स्थानिक निधी लेखापरिक्षण व संचालक, लेखा व कोषागरे यांच्या आस्थापनेवर जिल्हानिहाय मंजूर अधिकारी व कर्मचाऱ्यांची संख्या किती आहे,
(२) असल्यास, माहे मार्च, २०१८ अखेर रिक्त पदांची संख्या किती आहे,
(३) असल्यास, उपरोक्त रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०५-१०-२०१८) :** (१) संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षण व संचालक, लेखा व कोषागारे यांच्या आस्थापनेवरील

जिल्हानिहाय मंजूर अधिकारी व कर्मचाऱ्यांची संख्या दर्शविणारे विवरणपत्र सोबत जोडले आहे.

(२) सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये दर्शविल्याप्रमाणे आहे.

(३) शासन निर्णय दिनांक १६ मे, २०१८ नुसार रिक्त पदे भरण्याबाबतही उचित कार्यवाही करण्यात येत आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

| विवरण पत्र १:**गट अ ते ड (राजपत्रित व अराजपत्रित संवर्गातील (सरळसेवा व पदोन्नती) पदांची एकत्रित माहिती (दि ३१/०३/२०१८ रोजीची स्थिती)** | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| विभागाचे नांव - वित्त विभाग - संचालनालय लेखा व कोषागारे मुंबई | | | | | | | | | | | | | | | | |
| **अ.क्र** | **जिल्हा** | **एकुण मंजुर पदे** | | | | | **एकुण भरलेली पदे** | | | | | **एकुण रिक्त पदे** | | | | |
| | | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** |
| १ | नागपूर | ६ | २० | १७६ | ३२ | **२३४** | ३ | १७ | १३८ | २२ | **१८०** | ३ | ३ | ३८ | १० | **५४** |
| २ | भंडारा | ३ | १० | ४९ | १२ | **७४** | २ | १० | ३० | ७ | **४९** | १ | ० | १९ | ५ | **२५** |
| ३ | गोंदिया | ३ | ९ | ५३ | १४ | **७९** | ३ | ९ | ३३ | ७ | **५२** | ० | ० | २० | ७ | **२७** |
| ४ | गडचिरोली | ३ | १४ | ४३ | १८ | **७८** | ३ | १३ | ३५ | ९ | **६०** | ० | १ | ८ | ९ | **१८** |
| ५ | चंद्रपुर | ३ | १५ | ७२ | २१ | **१११** | ३ | १३ | ४९ | ११ | **७६** | ० | २ | २३ | १० | **३५** |
| ६ | वर्धा | ३ | १० | ५५ | १५ | **८३** | ३ | १० | ३७ | ७ | **५७** | ० | ० | १८ | ८ | **२६** |
| **एकुण नागपूर** | | **२१** | **७८** | **४४८** | **११२** | **६५९** | **१७** | **७२** | **३२२** | **६३** | **४७४** | **४** | **६** | **१२६** | **४९** | **१८५** |
| ७ | अमरावती | ६ | १९ | १०६ | २८ | **१५९** | ६ | १८ | ८५ | १६ | **१२५** | ० | १ | २१ | १२ | **३४** |
| ८ | अकोला | ३ | ९ | ५५ | १३ | **८०** | ३ | ८ | ३८ | ८ | **५७** | ० | १ | १७ | ५ | **२३** |
| ९ | बुलडाणा | ३ | ११ | ६६ | १६ | **९६** | ३ | १० | ४५ | १० | **६६** | ० | १ | २१ | ६ | **२८** |
| १० | वाशिम | ३ | ८ | ४१ | १३ | **६५** | २ | ७ | २३ | ८ | **४०** | १ | १ | १८ | ५ | **२५** |
| ११ | यवतमाळ | ३ | ११ | ७८ | २१ | **११३** | २ | १० | ५८ | १० | **८०** | १ | १ | २० | ११ | **३३** |
| **एकुण अमरावती** | | **१८** | **५८** | **३४६** | **९१** | **५१३** | **१६** | **५३** | **२४९** | **५२** | **३६८** | **२** | **५** | **९७** | **३९** | **१४३** |
| १२ | औरंगाबाद | ६ | १९ | १४० | २६ | **१९१** | ५ | १७ | १०१ | १५ | **१३७** | १ | २ | ३९ | ११ | **५३** |
| १३ | जालना | ३ | ११ | ३६ | १४ | **६४** | २ | १० | २४ | ८ | **४४** | १ | १ | १२ | ६ | **२०** |
| १४ | परभणी | ३ | १३ | ५० | १६ | **८२** | २ | १२ | ३० | ११ | **५५** | १ | १ | २० | ५ | **२७** |
| १५ | हिंगोली | ३ | ८ | ३८ | १० | **५९** | ३ | ८ | २३ | ७ | **४१** | ० | ० | १५ | ३ | **१८** |
| १६ | नांदेड | ३ | १७ | ६४ | २३ | **१०७** | ३ | १७ | ५७ | ११ | **८८** | ० | ० | ७ | १२ | **१९** |
| १७ | लातूर | ३ | १६ | ४१ | १६ | **७६** | ३ | १५ | ३० | ८ | **५६** | ० | १ | ११ | ८ | **२०** |
| १८ | उस्मानाबाद | ३ | १० | ४५ | १६ | **७४** | ३ | ७ | ३१ | ९ | **५०** | ० | ३ | १४ | ७ | **२४** |
| १९ | बीड | ३ | १२ | ५३ | १७ | **८५** | ३ | ११ | ४७ | ७ | **६८** | ० | १ | ६ | १० | **१७** |
| **एकुण औरंगाबाद** | | **२७** | **१०६** | **४६७** | **१३८** | **७३८** | **२४** | **९७** | **३४३** | **७६** | **५३९** | **३** | **९** | **१२४** | **६२** | **१९८** |
| २० | मुंबई | ० | ० | ० | ० | **०** | ० | ० | ० | ० | **०** | ० | ० | ० | ० | **०** |
| २१ | मुंबई उपनगर | ३७ | १०६ | ६५७ | १२७ | **९२७** | ३१ | ९१ | ४०८ | ८९ | **६१९** | ६ | १५ | २४९ | ३८ | **३०८** |
| २२ | ठाणे | १३ | १६ | १९८ | २४ | **२५१** | ७ | १६ | १५१ | १७ | **१९१** | ६ | ० | ४७ | ७ | **६०** |

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २३ | पालघर | ३ | १० | २१ | १३ | **४७** | ३ | ८ | १५ | ६ | **३२** | ० | २ | ६ | ७ | **१५** |
| २४ | रायगड | १ | १६ | ६२ | २१ | **१००** | १ | ११ | ३० | ११ | **५३** | ० | ५ | ३२ | १० | **४७** |
| २५ | रत्नागिरी | १ | १५ | ६० | १४ | **९०** | १ | १३ | २७ | १० | **५१** | ० | २ | ३३ | ४ | **३९** |
| २६ | सिंधुदुर्ग | १ | १० | ४४ | १४ | **६९** | १ | ९ | १९ | ८ | **३७** | ० | १ | २५ | ६ | **३२** |
| **एकुण कोकण** | | **५६** | **१७३** | **१०४२** | **२१३** | **१४८४** | **४४** | **१४८** | **६५०** | **१४१** | **९८३** | **१२** | **२५** | **३९२** | **७२** | **५०१** |
| २७ | नंदुरबार | ३ | ११ | ३३ | १२ | **६५** | ३ | ११ | २१ | १० | **४६** | ० | ० | १२ | २ | **१४** |
| २८ | धुळे | ३ | १० | ४१ | ९ | **६९** | ३ | ९ | २९ | ६ | **५०** | ० | १ | १२ | ३ | **१६** |
| २९ | जळगांव | ३ | १७ | ७५ | २२ | **१२८** | ३ | १६ | ४४ | ९ | **८४** | ० | १ | ३१ | १३ | **४५** |
| ३० | नाशिक | ५ | २३ | १७३ | ३१ | **१९७** | ५ | २३ | १३७ | २० | **१५३** | ० | ० | ३६ | ११ | **४७** |
| ३१ | अहमदनगर | ४ | १५ | ७३ | २१ | **१२५** | ४ | १५ | ४६ | ९ | **८६** | ० | ० | २७ | १२ | **३९** |
| **एकुण नाशिक** | | **१८** | **७६** | **३९५** | **९५** | **५८४** | **१८** | **७४** | **२७७** | **५४** | **४१९** | **०** | **२** | **११८** | **४१** | **१६१** |
| ३२ | पुणे | ६ | ३४ | २७० | ३८ | **२९८** | ६ | ३३ | २०० | १६ | **२१९** | ० | १ | ७० | २२ | **९३** |
| ३३ | सातारा | ३ | १७ | ७७ | १८ | **१२४** | ३ | १७ | ५६ | १३ | **१०३** | ० | ० | २१ | ५ | **२६** |
| ३४ | सांगली | ३ | १९ | ६४ | १८ | **११३** | ३ | १७ | ४५ | १० | **७८** | ० | २ | १९ | ८ | **२९** |
| ३५ | कोल्हापूर | ३ | १९ | ८१ | २० | **१३०** | ३ | १९ | ६५ | १२ | **१०५** | ० | ० | १६ | ८ | **२४** |
| ३६ | सोलापूर | ३ | १६ | ७५ | १९ | **१३८** | ३ | १५ | ५० | १३ | **१०१** | ० | १ | २५ | ६ | **३२** |
| **एकुण पुणे** | | **१८** | **१०५** | **५६७** | **११३** | **८०३** | **१८** | **१०१** | **४१६** | **६४** | **६०६** | **०** | **४** | **१५१** | **४९** | **२०४** |
| **एकुण सर्व जिल्हे** | | **१५८** | **५९६** | **३२६५** | **७६२** | **४७८१** | **१३७** | **५४५** | **२२५७** | **४५०** | **३३८९** | **२१** | **५१** | **१००८** | **३१२** | **१३९२** |

| **अ.क्र** | **जिल्हा** | **एकुण मंजुर पदे** | | | | | **एकुण भरलेली पदे** | | | | | **एकुण रिक्त पदे** | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकुण** |
| १ | नागपूर | २१ | ७८ | ४४८ | ११२ | **६५९** | १७ | ७२ | ३२२ | ६३ | **४७४** | ४ | ६ | १२६ | ४९ | **१८५** |
| २ | अमरावती | १८ | ५८ | ३४६ | ९१ | **५१३** | १६ | ५३ | २४९ | ५२ | **३६८** | २ | ५ | ९७ | ३९ | **१४३** |
| ३ | औरंगाबाद | २७ | १०६ | ४६७ | १३८ | **७३८** | २४ | ९७ | ३४३ | ७६ | **५३९** | ३ | ९ | १२४ | ६२ | **१९८** |
| ४ | कोकण | ५६ | १७३ | १०४२ | २१३ | **१४८४** | ४४ | १४८ | ६५० | १४१ | **९८३** | १२ | २५ | ३९२ | ७२ | **५०१** |
| ५ | नाशिक | १८ | ७६ | ३९५ | ९५ | **५८४** | १८ | ७४ | २७७ | ५४ | **४१९** | ० | २ | ११८ | ४१ | **१६१** |
| ६ | पुणे | १८ | १०५ | ५६७ | ११३ | **८०३** | १८ | १०१ | ४१६ | ६४ | **६०६** | ० | ४ | १५१ | ४९ | **२०४** |
| **एकुण सर्व जिल्हे** | | **१५८** | **५९६** | **३२६५** | **७६२** | **४७८१** | **१३७** | **५४५** | **२२५७** | **४५०** | **३३८९** | **२१** | **५१** | **१००८** | **३१२** | **१३९२** |

**विवरण पत्र २**

**शासकीय कार्यालये / जिल्हा परिषदेतील दिनांक ३१/०३/२०१८ अखेर जिल्हानिहाय मंजूर व रिक्त पदांची माहिती. गट अ ते गट - ड(राजपत्रित व अराजपत्रित) संवर्गातील (सरळसेवा व पदोन्नती) पदांची एकत्रित माहिती.**

विभागाचे नाव :- संचालनालय स्थानिक निधी लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य

| **अक्र** | **जिल्हा** | **एकूण मंजूर पदे** | | | | | **एकूण भरलेली पदे** | | | | | **एकूण रिक्त पदे** | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** |
| १ | नागपूर | ३ | ६ | ४७ | ८ | **६४** | ३ | ६ | ३८ | ६ | **५३** | ० | ० | ९ | २ | **११** |
| २ | भंडारा | १ | ३ | २१ | २ | **२७** | १ | ३ | १३ | ० | **१७** | ० | ० | ८ | २ | **१०** |
| ३ | गोंदिया | १ | ३ | २१ | १ | **२६** | १ | ३ | १३ | ० | **१७** | ० | ० | ८ | १ | **९** |

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | गडचिरोली | १ | ३ | २० | २ | **२६** | १ | ३ | १० | ० | **१४** | ० | ० | १० | २ | **१२** |
| ५ | चंद्रपूर | १ | ४ | ३२ | २ | **३९** | १ | ४ | १४ | १ | **२०** | ० | ० | १८ | १ | **१९** |
| ६ | वर्धा | १ | ३ | २१ | २ | **२७** | १ | २ | १६ | ० | **१९** | ० | १ | ५ | २ | **८** |
| | **एकूण नागपूर** | **८** | **२२** | **१६२** | **१७** | **२०९** | **८** | **२१** | **१०४** | **७** | **१४०** | **०** | **१** | **५८** | **१०** | **६९** |
| ७ | अमरावती | ३ | ७ | ४२ | ७ | **५९** | ३ | ७ | ३६ | ६ | **५२** | ० | ० | ६ | १ | **७** |
| ८ | अकोला | १ | ४ | २१ | २ | **२८** | १ | ४ | १९ | १ | **२५** | ० | ० | २ | १ | **३** |
| ९ | बुलढाणा | १ | ४ | ३२ | २ | **३९** | १ | ४ | २२ | १ | **२८** | ० | ० | १० | १ | **११** |
| १० | वाशिम | १ | ३ | १८ | १ | **२३** | १ | २ | १२ | ० | **१५** | ० | १ | ६ | १ | **८** |
| ११ | यवतमाळ | १ | ४ | ३५ | २ | **४२** | १ | ४ | २५ | १ | **३१** | ० | ० | १० | १ | **११** |
| | **एकूण अमरावती** | **७** | **२२** | **१४८** | **१४** | **१९१** | **७** | **२१** | **११४** | **९** | **१५१** | **०** | **१** | **३४** | **५** | **४०** |
| १२ | औरंगाबाद | १० | ४१ | ४७ | १० | **१०८** | ८ | २९ | ३७ | ५ | **७९** | २ | १२ | १० | ५ | **२९** |
| १३ | जालना | १ | ३ | २१ | २ | **२७** | १ | ३ | १९ | १ | **२४** | ० | ० | २ | १ | **३** |
| १४ | परभणी | १ | ४ | २० | २ | **२७** | १ | ४ | १६ | १ | **२२** | ० | ० | ४ | १ | **५** |
| १५ | हिंगोली | १ | ४ | १३ | १ | **१९** | १ | ३ | ९ | १ | **१४** | ० | १ | ४ | ० | **५** |
| १६ | नांदेड | १ | ४ | २६ | २ | **३३** | १ | ४ | २० | १ | **२६** | ० | ० | ६ | १ | **७** |
| १७ | लातूर | १ | ३ | २२ | २ | **२८** | १ | ३ | १९ | १ | **२४** | ० | ० | ३ | १ | **४** |
| १८ | उस्मानाबाद | १ | ३ | २१ | २ | **२७** | १ | ३ | १६ | २ | **२२** | ० | ० | ५ | ० | **५** |
| १९ | बीड | १ | ४ | २२ | २ | **२९** | १ | ४ | १६ | १ | **२२** | ० | ० | ६ | १ | **७** |
| | **एकूण औरंगाबाद** | **१७** | **६६** | **१९२** | **२३** | **२९८** | **१५** | **५३** | **१५२** | **१३** | **२३३** | **२** | **१३** | **४०** | **१०** | **६५** |
| २० | ठाणे | २० | ६० | ८९ | १७ | **१८६** | १९ | ४४ | ६९ | ७ | **१३९** | १ | १६ | २० | १० | **४७** |
| २१ | पालघर | १ | ४ | २३ | १ | **२९** | ० | ३ | १७ | ० | **२०** | १ | १ | ६ | १ | **९** |
| २२ | रायगड | १ | ४ | ३० | २ | **३७** | १ | ४ | १७ | ० | **२२** | ० | ० | १३ | २ | **१५** |
| २३ | रत्नागिरी | १ | ४ | २६ | २ | **३३** | १ | ३ | १३ | ० | **१७** | ० | १ | १३ | २ | **१६** |
| २४ | सिंधुदुर्ग | १ | ३ | २२ | २ | **२८** | १ | ३ | ९ | १ | **१४** | ० | ० | १३ | १ | **१४** |
| | **एकूण कोकण** | **२४** | **७५** | **१९०** | **२४** | **३१३** | **२२** | **५७** | **१२५** | **८** | **२१२** | **२** | **१८** | **६५** | **१६** | **१०१** |
| २५ | नंदुरबार | १ | ४ | १६ | १ | **२२** | १ | ४ | १० | १ | **१६** | ० | ० | ६ | ० | **६** |
| २६ | धुळे | १ | ३ | १७ | २ | **२३** | १ | ३ | १५ | १ | **२०** | ० | ० | २ | १ | **३** |
| २७ | जळगाव | १ | ४ | ३३ | २ | **४०** | १ | ४ | २६ | ० | **३१** | ० | ० | ७ | २ | **९** |
| २८ | नाशिक | ३ | ७ | ४४ | ७ | **६१** | ३ | ७ | ३७ | ६ | **५३** | ० | ० | ७ | १ | **८** |
| २९ | अहमदनगर | १ | ४ | ३७ | २ | **४४** | १ | ४ | २३ | २ | **३०** | ० | ० | १४ | ० | **१४** |
| | **एकूण नाशिक** | **७** | **२२** | **१४७** | **१४** | **१९०** | **७** | **२२** | **१११** | **१०** | **१५०** | **०** | **०** | **३६** | **४** | **४०** |
| ३० | पुणे | ३ | ६ | ५२ | ६ | **६७** | ३ | ६ | ३९ | ४ | **५२** | ० | ० | १३ | २ | **१५** |
| ३१ | सातारा | १ | ४ | ३५ | २ | **४२** | १ | ४ | २७ | २ | **३४** | ० | ० | ८ | ० | **८** |
| ३२ | सांगली | १ | ३ | ३० | २ | **३६** | १ | ३ | १६ | २ | **२२** | ० | ० | १४ | ० | **१४** |
| ३३ | कोल्हापूर | १ | ४ | ३७ | २ | **४४** | १ | ४ | २१ | २ | **२८** | ० | ० | १६ | ० | **१६** |

| | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३४ | सोलापूर | १ | ४ | ३३ | २ | **४०** | १ | ४ | २१ | २ | **२८** | ० | ० | १२ | ० | **१२** |
| | **एकूण पुणे** | **७** | **२१** | **१८७** | **१४** | **२२९** | **७** | **२१** | **१२४** | **१२** | **१६४** | **०** | **०** | **६३** | **२** | **६५** |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | **एकूण एकंदर** | **७०** | **२२८** | **१०२६** | **१०६** | **१४३०** | **६६** | **१९५** | **७३०** | **५९** | **१०५०** | **४** | **३३** | **२९६** | **४७** | **३८०** |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| **अक्र** | **विभाग** | **एकूण मंजूर पदे** | | | | | **एकूण भरलेली पदे** | | | | | **एकूण रिक्त पदे** | | | | |
| | | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** | **अ** | **ब** | **क** | **ड** | **एकूण** |
| १ | नागपूर | ८ | २२ | १६२ | १७ | **२०९** | ८ | २१ | १०४ | ७ | **१४०** | ० | १ | ५८ | १० | **६९** |
| २ | अमरावती | ७ | २२ | १४८ | १४ | **१९१** | ७ | २१ | ११४ | ९ | **१५१** | ० | १ | ३४ | ५ | **४०** |
| ३ | औरंगाबाद | १७ | ६६ | १९२ | २३ | **२९८** | १५ | ५३ | १५२ | १३ | **२३३** | २ | १३ | ४० | १० | **६५** |
| ४ | कोकण | २४ | ७५ | १९० | २४ | **३१३** | २२ | ५७ | १२५ | ८ | **२१२** | २ | १८ | ६५ | १६ | **१०१** |
| ५ | नाशिक | ७ | २२ | १४७ | १४ | **१९०** | ७ | २२ | १११ | १० | **१५०** | ० | ० | ३६ | ४ | **४०** |
| ६ | पुणे | ७ | २१ | १८७ | १४ | **२२९** | ७ | २१ | १२४ | १२ | **१६४** | ० | ० | ६३ | २ | **६५** |
| | **एकूण विभाग** | **७०** | **२२८** | **१०२६** | **१०६** | **१४३०** | **६६** | **१९५** | **७३०** | **५९** | **१०५०** | **४** | **३३** | **२९६** | **४७** | **३८०** |

---

## मुंबई विद्यापीठांतर्गत नविन महाविद्यालये सुरु करण्याबाबत

**(३९) ४३१८८ (०१-०८-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई विद्यापीठांतर्गत सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून कोकणात २२ नविन महाविद्यालये सुरु करण्यास उच्च व तंत्र शिक्षण विभागाने माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान मान्यता दिली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मान्यता दिलेल्या महाविद्यालयांमध्ये मुंबईत ६, ठाण्यात ७ महाविद्यालयांसह पालघर, रायगड, रत्नागिरी आणि सिंधुदुर्गमध्ये महाविद्यालय सुरु होणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर निर्णयावर अंमलबजावणी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, त्याचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (११-१०-२०१८) :** (१), (२), (३) व (४) महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ मधील तरतूदीनुसार मुंबई विद्यापीठांतर्गत शासन निर्णय दिनांक २८/०२/२०१८ अन्वये एकूण २२ महाविद्यालयांना इरादापत्र निर्गमित करण्यात आलेले असून त्यापैकी शासन निर्णय दिनांक १५/०६/२०१८ अन्वये एकूण १७ नवीन महाविद्यालयांस शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासून अंतिम मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

---

## सिंधुदुर्ग व रत्नागिरी जिल्ह्यातील विकासदर योजनेबाबत

**(४०) ४३२०८ (०२-०८-२०१८). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जिल्ह्यांचा विकासदर वाढविण्यासाठी केंद्र शासनाने राज्यातील सिंधुदुर्ग व रत्नागिरी या दोन जिल्ह्यांची निवड केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर योजनेंतर्गत उक्त जिल्ह्यात कोणकोणत्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यात येणार आहे व त्याचे स्वरुप काय आहे तसेच उपरोक्त विकासदर योजना कार्यान्वित होण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (०३-११-२०१८) :** (१) होय.

(२) केंद्र शासन व निती आयोगाने “संकल्प से सिध्दी” (Sankalp-se-Siddhi) चळवळ सुरू करण्याबाबत दिलेल्या सूचनांप्रमाणे “District Vision” तयार करण्याबाबत नियोजन विभागाकडून दिनांक ६ ऑक्टोबर, २०१७ च्या परिपत्रकाद्वारे सूचना देण्यात आल्या आहेत. नियोजन विभागाकडून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) २०१८-१९ तयार करताना तो “District Vision” मध्ये निश्चित केलेली उद्दिष्टे कालमर्यादेत साध्य होण्याच्यादृष्टीने सदर उद्दिष्टांशी सुसंगत असावा, अशीही सूचना यापुर्वी दिलेली आहे.

केंद्र शासनाचे वाणिज्य व उद्योग मंत्रालयाकडून “District Development Initiative” कार्यक्रम हाती घेतल्याचे संदर्भात पत्राद्वारे दिलेल्या सूचनेनुसार सिंधुदुर्ग व रत्नागिरी या दोन जिल्हयांचा विकास दर वाढविण्याच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग व जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना “प्रस्तावित” “District Development Initiative” या कार्यक्रम बाबत मार्गदर्शक सूचना केंद्र शासनाचे वाणिज्य व उद्योग मंत्रालयाकडून निर्गमित होईल या पार्श्वभूमीवर “District Vision” दस्तऐवजाच्या आधारे “District Development Initiative” ची एक रुपरेषा तयार करण्याकरीता निर्देश देण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली जिल्ह्यातील शेतकऱ्यांना ठिबक व तुषार सिंचनासाठीचे अनुदान देण्याबाबत

**(४१) ४३२५० (०२-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्ह्यात कृषी विभागामार्फत ठिबक व तुषार सिंचनासाठी चालू वर्षाकरीता शासनाने किती शेतकऱ्यांना शासनाकडून अनुदान अदा करण्यात आले आहे,

(२) असल्यास, या योजनेत एकूण किती शेतकऱ्यांचे अर्ज प्राप्त झाले आहेत, त्यापैकी किती शेतकऱ्यांचे अर्ज मंजूर करण्यात आले व त्यापैकी किती अर्ज प्रलंबित आहेत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन प्रलंबित अर्ज मंजूर करुन ठिबक व तुषार सिंचनाचे अनुदान शेतकऱ्यांना वाटप करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२०-१०-२०१८) :** (१) हिंगोली जिल्ह्यात ठिबक व तुषार सिंचनासाठी सन २०१७-१८ या वर्षात ७२४६ शेतकऱ्यांना रुपये १३.३७ कोटी एवढया रकमेचे अदा करण्यात आले आहे.

(२)

| | | |
|---|---|---|
| **१** | एकूण प्राप्त व पुर्वसंमती दिलेल्या अर्जदारांची संख्या | १२३९० |
| **२** | विविध कारणांमुळे रद्द झालेले अर्ज | ५१३९ |
| **३** | पुर्वसंमती प्राप्त पात्र अर्जांपैकी सूक्ष्म सिंचन संच बसवून अनुदानासाठी प्रस्ताव सादर केलेल्या व अनुदान अदा केलेल्या अर्जदारांची संख्या | ७२४६ |
| **४** | अनुदानासाठी प्रलंबित अर्जांची संख्या | निरंक |

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## हिंगोली जिल्ह्यात जलयुक्त शिवाराच्या कामांना मंजूरी देण्याबाबत

**(४२) ४३२५१ (०१-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्ह्यात सन २०१७-१८ या वर्षात जलयुक्त शिवाराच्या किती कामांना मंजूरी देण्यात आली आहे,

(२) असल्यास, त्यापैकी किती कामे सुरु आहेत, सदर कामांवर किती खर्च करण्यात आला आहे,

(३) असल्यास, त्यापैकी किती कामे अपूर्ण आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०१-१०-२०१८) :** (१) हिंगोली जिल्ह्यात सन २०१७-१८ या वर्षात २४६९ कामांना मंजूरी देण्यात आली आहे.

(२) व (३) मंजूर कामापैकी २२२७ कामे हाती घेण्यात आली आहेत. त्यापैकी २००८ कामे पूर्ण करण्यात आली असून २४२ कामे अपूर्ण आहेत. सदरील कामांवर रक्कम रुपये १४.८९ कोटी खर्च करण्यात आला आहे.

---

## भुरक्याची वाडी (ता.कळमनुरी, जि.हिंगोली) आदिवासी गावातील पाणीटंचाई दूर करण्याबाबत

**(४३) ४३२५७ (०१-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भुरक्याची वाडी (ता.कळमनुरी, जि.हिंगोली) या आदिवासी गावात माहे डिसेंबरपासून ते जूनपर्यंत आदिवासी जनतेला पिण्याच्या पाण्याच्या टंचाईचा सामना करावा लागत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी तसेच ग्रामस्थांनी जिल्हाधिकारी, हिंगोली यांच्याकडे पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करण्याबाबत लेखी निवेदने दिली आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन भुरक्याची वाडी या आदिवासी गावातील पाणीटंचाई दूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (०४-१०-२०१८) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) हे खरे नाही.

(३) भुरक्याची वाडी या आदिवासी गावात ८ हातपंप, ३ विद्‌युतपंप व एक नळ पाणीपुरवठा योजना आहे. परंतु उन्हाळयात पाणी संपत असून पाणी टंचाई दूर करण्याबाबत पाणी टंचाई कालावधीमध्ये एक खाजगी विहिर व एक खाजगी विंधन विहिर अधिग्रहण करुन गावास पाणीपुरवठा करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मागाठाणे विधानसभा क्षेत्रातील वनखात्यातील प्रश्नांबाबत संयुक्त बैठक आयोजित करणेबाबत

**(४४) ४३३२८ (०१-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मागाठाणे विधानसभा क्षेत्रातील वन विभागातील प्रश्नांबाबत संयुक्त बैठक आयोजित करणेबाबत मा.वन मंत्री यांना लोकप्रतिनिधींनी दिनांक १८ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनानुसार शासनाने या संदर्भात बैठक आयोजित केली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१९-१०-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) मागाठाणे विधानसभा क्षेत्रात मुख्यत्वे संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाचे क्षेत्र मोडते. संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या विविध प्रश्नांबाबत तोडगा काढण्याच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री, मा.मंत्री (वने) व इतर स्तरावर वेळोवेळी बैठका घेवून बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयांची अंमलबजावणी सुरु आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नेवासा (जि.अहमदनगर) येथील श्री.मिनीनाथ माळी यांना शिष्यवृत्ती वेळेवर मिळाली नसल्याबाबत

**(४५) ४३३६६ (०१-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नेवासा (जि.अहमदनगर) येथील श्री.मिनीनाथ माळी यांना शिष्यवृत्ती वेळेवर देण्यास निष्काळजी पणा करणाऱ्या कर्मचाऱ्यांविरुध्द कारवाई करण्याचे निर्देश मा.मुख्यमंत्री यांनी माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान जनता दरबारात दिले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, मा.मुख्यमंत्री यांनी निर्देश देऊनही कोणतीच कार्यवाही न होण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१५-१०-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) श्री.मिनीनाथ माळी यांनी सन २०१२-१३ वर्षातील शिष्यवृत्ती मिळण्याकरीता सादर केलेल्या अर्जामध्ये चुकीचा बँक खाते क्रमांक टाकल्यामुळे श्री.माळी यांना शिष्यवृत्ती मंजूर होऊनसुध्दा त्यांच्या बँक खात्यात जमा होऊ शकली नाही. तसेच सन २०१३-१४ या वर्षाकरीताचा शिष्यवृत्तीचा अर्ज महाविद्यालयाने प्रकल्प कार्यालयास सादर न केल्यामुळे शिष्यवृत्ती मंजूर करण्यात आली नाही.

श्री.मिनीनाथ माळी यांनी सन २०१३-१४ व २०१४-१५ ची शिष्यवृत्ती बँक खाती जमा न झाल्याबाबत तक्रार अर्ज मंत्रालयीन लोकशाही दिनात केलेला होता. दिनांक ७ मे, २०१८ रोजी जिल्हाधिकारी कार्यालय, अहमदनगर येथे झालेल्या लोकशाही दिनाच्या सुनावणीच्या अनुषंगाने श्री.मिनीनाथ माळी यांना सन २०१३-१४ व २०१४-१५ या वर्षातील शिष्यवृत्ती प्रती वर्ष रक्कम रुपये ३०००/- प्रमाणे एकूण रुपये ६,०००/- दिनांक ११/०५/२०१८ रोजी जमा करण्यात आली आहे.

तसेच यानुषंगाने श्री.माळी यांनी आपले सरकार पोर्टलवर केलेल्या तक्रारीची वेळीच दखल न घेतल्याने भारत सरकार शिष्यवृत्तीबाबत कामकाज हाताळणाऱ्या दोन कर्मचाऱ्यांची पुढील वेतनवाढ (पुढील वेतनवाढीवर परिणाम न करणारी) एक वर्षाकरीता रोखून ठेवण्याचे आदेश देण्यात आलेले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विहिरींचे खोदकाम अपूर्ण असल्याबाबत

**(४६) ४३४२४ (०१-०८-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात पाणीटंचाईची समस्या वाढत असल्याने २४७५ लहान व मोठ्या धरणांत पाणी साठविले जाते तसेच ५७८२ टीएमसी पाणी उपलब्ध असतांना पाणीटंचाई निर्माण होत असून ७६००० पेक्षा जास्त विहिरींचे खोदकाम अपूर्ण असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मागील वर्षी ७६६९४ विहिरींचे खोदकाम पूर्ण होणार होते, परंतु नागपूर येथील ७५३२, अमरावती येथील १९६७४, औरंगाबाद येथील ३०८०६, कोकण येथील २४३५, नाशिक येथील १३७१७, पुणे येथील २५३० विहिरींचे खोदकाम अपूर्ण आहेत, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२९-१०-२०१८) :** (१) व (२) रोहयोंतर्गत धडक सिंचन विहिर कार्यक्रम सन २००६ पासून सूरु झाला असून त्यामध्ये आतापर्यंत ४८,६२१ विहिरीचे कामे पूर्ण झाली आहेत.

तसेच नागपूर विभागातील ११,००० सिंचन विहिर कार्यक्रम दिनांक ११ सप्टेंबर, २०१६ पासून सूरु झाला असून सदर कार्यक्रमांतर्गत ८,३४८ इतक्या विहिरी पूर्ण झालेल्या आहेत.

नरेगांतर्गत सन २०१७-१८ ते सन २०१८-१९ या कालावधीमध्ये एकूण ४७,४२४ इतक्या विहिरी पूर्ण झाल्या आहेत.

| | | |
|---|---|---|
| कोकण विभाग | - | ६२६ |
| नाशिक विभाग | - | ८७५६ |
| पुणे विभाग | - | १८४१ |
| औरंगाबाद विभाग | - | १७६६७ |
| अमरावती विभाग | - | १२८४० |
| नागपूर विभाग | - | ५६९४ |
| एकूण | - | ४७,४२४ विहिरी पूर्ण झाल्या आहेत. |

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील स्वस्तभाव दुकानातून लाभार्थ्यांना धान्य वाटप करण्याबाबत

**(४७) ४३४२७ (०१-०८-२०१८). श्री.आनंदराव पाटील, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील स्वस्तभाव दुकानदारांच्या माहे एप्रिल, २०१८ मध्ये होणाऱ्या संपाच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय अन्नसुरक्षा योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांसाठी अन्नधान्याची उचल करुन विहित वेळेत वाटप करण्याकरीता मा.लोकप्रतिनिधींनी संबंधितांना निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू निवेदनावर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (०९-१०-२०१८) :** (१) व (२) शासन पत्र क्रमांक अधापु-२०१८/प्र.क्र.३५/नापू-२२ यांच्या दिनांक २२ मार्च, २०१८ च्या पत्रान्वये नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई, उपआयुक्त (पुरवठा), (सर्व), जिल्हा पुरवठा अधिकारी (सर्व), अन्नधान्य वितरण अधिकारी (सर्व) यांना रास्तभाव दुकानदारांच्या माहे एप्रिल, २०१८ मध्ये होणाऱ्या संपाच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेंतर्गत पात्र लाभार्थ्यांसाठी अन्नधान्याची उचल करून विहित वेळेत वाटप करण्याबाबत कळविण्यात आले होते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जीवन विकास एज्युकेशन सोसा. नागपूर या संस्थेद्वारा संचलित सर्व शाळांमधील व्यवहार व गैरकारभाराची चौकशी करण्याबाबत

**(४८) ४८८२९ (१५-०१-२०१४). श्री.नागो गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जीवन विकास एज्यु.सोसा. नागपूर या संस्थेद्वारा नागपूर जिल्हयात एकूण २० शाळा चालविण्यात येतात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या शाळांमधील गैरव्यवहार व गैरकारभाराबाबत चौकशी करण्याकरीता नागपूर विभागाच्या जनप्रतिनिधींनी शिक्षणाधिकारी (माध्य.) जिल्हा परिषद, नागपूर व शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग यांचेकडे अनेक तक्रारी दिल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करुन कारवाई करण्यात आली आहे काय,

(४) तसेच शासन यासंबंधी चौकशी करण्याचे व कारवाई करण्याचे आदेश देणार आहे काय, असल्यास, सदरहू आदेश केव्हापर्यंत देण्याचे अपेक्षित आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३१-१०-२०१८) :** (१) सदर संस्थेद्वारे एकूण १५ शाळा चालविण्यात येतात.

(२) होय.

(३), (४) व (५) सदर तक्रारींच्या अनुषंगाने जीवन विकास एज्युकेशन सोसा. नागपूर या संस्थेद्वारा संचलित शाळांची विशेष पथकामार्फत चौकशी करण्यात आली. तथापि, संस्थेतील वाद संपुष्टात आला असून शाळा सुरळीत सुरु आहेत. व्यवस्थापनाबाबत कर्मचाऱ्यांच्या तक्रारी नाहीत असे चौकशी पथकास दिसून आले.

---

## महाल, नागपूर येथील शिशु विकास उच्च प्राथमिक शाळा व माध्यमिक विद्यालय येथील नियमबाहय कामकाजाबाबत व भ्रष्टाचाराबाबत

**(४९) ५०१०३ (०५-०७-२०१४). श्री.नागोराव गाणार : तारांकित प्रश्न क्रमांक २२०५१ ला दिनांक १६ डिसेंबर, २०११ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाल, नागपूर येथील शिशु विकास माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालयातील नियमबाह्य कामकाजाबाबत व भ्रष्टाचाराबाबत सदरहू शाळेवर प्रशासक नियुक्त करण्याबाबत दिनांक २२ मार्च, २०१३ रोजी स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री यांना पत्र देऊन तात्काळ कार्यवाही करण्याची मागणी केली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त पत्राच्या अनुषंगाने शासनाने पत्र क्र. २९६२८/१३, दिनांक ८ एप्रिल, २०१३ अन्वये सदरहू पत्र पुढील कार्यवाहीस्तव अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांचेकडे पाठविले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात आली,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (३१-१०-२०१८)** : (१) व (२) या संदर्भातील पत्र आढळून आले नाही.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर जिल्हयातील पर्यवेक्षक व प्रगणकांचा सामाजिक आर्थिक व जात सर्वेक्षण कामाचे मानधन देण्यात न आल्याबाबत

**(५०) ५११५६ (०३-०७-२०१४). श्री.नागोराव गाणार** : सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर जिल्हयात सन २०११ मध्ये सामाजिक, आर्थिक व जात सर्वेक्षण करण्यात आले हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ह्या सर्वेक्षणाचे काम केलेल्या पर्यवेक्षक व प्रगणकांना अद्यापपर्यंत मानधन देण्यात आले नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या प्रकरणी शहर जनगणना अधिकारी, नागपूर महानगरपालिका व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा नागपूर यांनी शासनाकडून निधी अप्राप्त असल्याचे पत्र दिले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, लागणारा निधी देण्यास विलंब लागण्याची कारणे काय आहेत,
(५) तसेच, शासन हा लागणारा निधी केंव्हा पर्यंत देणार आहे ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०३-१०-२०१८) :** (१) होय.

(२) नागपूर जिल्ह्यातील ग्रामीण भागातील प्रगणक व पर्यवेक्षक यांना त्यांच्या मानधनाची रक्कम अदा करण्यात आलेली आहे. महानगरपालिका क्षेत्रातील प्रगणक व पर्यवेक्षक यांच्या मानधनाची एकूण रक्कम रुपये २,५२,७०,७००/- इतकी असून त्यापैकी रुपये १,१६,६०,७००/- इतके मानधन अदा करण्यात आलेले आहे.

(३), (४) व (५) सामाजिक, आर्थिक व जात सर्वेक्षणाचे काम अंतिम टप्प्यात आलेले असून प्रारुप यादी प्रसिध्द करणे, दावे आक्षेप निकालात काढणे इत्यादी प्रक्रिया सुरु करण्यात येत आहे, या सर्वेक्षणाचा कालावधी वाढल्यामुळे खर्चात वाढ झाली असून राज्य शासनाने केंद्र शासनाकडे अतिरिक्त निधीची मागणी केलेली आहे. केंद्र शासनाकडून निधी प्राप्त होताच प्रगणक/पर्यवेक्षकांच्या मानधनाकरीता निधी वितरीत करण्यात येईल.

---

**विधान भवन :** **डॉ. अनंत कळसे**

**मुंबई.** **प्रधान सचिव,**

**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.